ज्ञा ने श्व री

# अध्याय पहिला

मूळ संहिता, पाठभेद, प्रस्तावना, टीपा स्पष्टीकरण,
शब्दकोश, व भाषाशास्त्रविषयक परिशिष्टासह.

: संपादक :


दत्तात्रय सीताराम पंगु
राजाराम कॉलेज, कोल्हापूर.





आषाढ शु॥ प्रतिपदा १८७३
५ जुलै, १९५१

किंमत ३ रुपये

स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

# अध्याय पहिला

ज्ञानेश्वरीचें सांप्रदायिक अथवा पारंपरिक दृष्ट्या केलेलें विवेचन भाविक व श्रद्धालु भक्तजनांना आजवर जरी परमार्थिक समाधान देणारें झालें असलें, तरी लौकिक दृष्ट्या त्या ग्रंथाकडे पाहणाऱ्या आजकालच्या चिकित्सक संशोधकांना तें सर्वांगपरिपूर्ण वाटलें आहे, असें दिसत नाहीं. विश्वविद्यालयाच्या उच्चतम अभ्यासक्रमात ज्ञानेश्वरीचा अंतर्भाव होऊं लागल्यापासून तिच्यांतील पाठभेद, अर्थलापनिका, भाषाशैली, तत्त्वज्ञान इत्यादि बहिरंगांचें भरपूर विवेचन झाल्याचें आढळून येतें. कांहींनीं तर याहीपुढें जाऊन ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाचा अधिक सखोल विचार करतांना, शंकराचार्य व रामानुजाचार्य यांच्या गीताभाष्याशीं ज्ञानेश्वरीची तुलना करून, ज्ञानेश्वरांनीं कोणत्या आचार्यांचें कितपत अनुसरण केलें आहे, अथवा ज्ञानेश्वरांनीं ज्या 'भाष्यकारांना वाट पुसिली' आहे, ते भाष्यकार कोणते असावे? अशा प्रश्नाची मोठी उद्बोधक चर्चा आपल्या ग्रंथांतून केली असून, कांहींनीं तर वामनपंडितांच्या 'यथार्थदीपिके' सारख्या प्राकृत टीकेशीं ज्ञानेश्वरीची तुलना करून, ज्ञानेश्वरांचें भक्तिविषयक वैशिष्ट्य स्पष्ट करण्याचा थोडा फार यशस्वी प्रयत्न केलेला आढळतो. या तौलनिक अभ्यासाबरोबरच ज्ञानेश्वरकालीन समाज, ज्ञानेश्वरकालीन ऐतिहासिक व राजकीय परिस्थिति, ज्ञानेश्वरकालीन नाथपंथ व वारकरी संप्रदाय, इत्यादि आजूबाजूच्या आणखी बऱ्याच विषयांचा विचार झाला असला, तरी ज्ञानेश्वरीच्या अंतरंगाच्या अभ्यासानें ज्ञानेश्वरांच्या अलौकिक व्यक्तित्वाचा, त्यांच्या महनीय काव्य-गुणांचा, त्यांच्या सूक्ष्मावलोकन, बहुश्रुततादि निरुपम बौद्धिक गुणांचा कानोसा आजपर्यंत फारसा कोणी घेतलेला दिसत नाहीं. कोणत्याही ग्रंथ—

काराच्या व्यक्तित्वाचें प्रतिबिंब त्यांच्या ग्रंथांत कसें पडलें आहे, हें आज-मावून त्याचा त्याच्या जीवनाशीं कितपत मेळ घालतां येतो, हें पाहणें जितकें मनोरंजक तितकेंच तें आधुनिक टीकेचें एक प्रमुख अंग मानलें गेलें आहे. प्रस्तुत प्रथमाध्यायाच्या अनुरोधानें, ज्ञानेश्वरांच्या अंतरंगाचा अथवा त्यांच्या आत्मिक व बौद्धिक गुणांचा सांपडेल तो कानोसा घेण्याचा कांहींसा प्रयत्न येथे केला असून, तोच मांडण्याचा हा अल्पसा उपक्रम आहे.

## ज्ञानेश्वरांचें अलौकिक व्यक्तित्व

वास्तविक ज्ञानेश्वरी हा श्रीमद्भगवद्गीतेवरील एक टीकाग्रंथ असल्या-मुळें, अशाप्रकारच्या बुद्धिनिष्ठ स्वरूपाच्या ग्रंथांत ज्ञानेश्वरांचें व्यक्तित्व अविष्कृत होण्यास कसा काय अवसर मिळाला असेल, अशी शंका पुष्कळांना येण्याचा संभव आहे. पण आपल्या ग्रंथाच्या प्रत्येक अध्यायाचा प्रस्ताव करतांना, इष्टदेवतेच्या नमनप्रसंगीं अथवा आपल्या गुरूंना नमन करण्याच्या प्रसंगीं किंवा श्रोत्यांना आपल्या व्याख्यानाकडे अवधान देण्याची विनवणी करण्याच्या प्रसंगीं, ज्ञानेश्वरांनीं जो मुळाहूनही अधिक असा ग्रंथविस्तार केला आहे, त्यांतच त्यांचें उपनिर्दिष्ट श्रेष्ठ व्यक्तिमत्त्व सांठविलेलें आहे. येथे या प्रथमाध्यायापुरताच विचार केला, तरी आरंभीच्या ८४ ओव्यांच्या या प्रदीर्घ प्रस्तावनेंत पहिल्याच ओवींत केलेल्या परब्रह्मनमनावरून ज्ञानेश्वरांची निर्गुणोपासनानिष्ठा जशी निदर्शनास येते, तद्वतच पुढील वीस ओव्यांत शब्द-ब्रह्मावर गणेशाचें रूपक कल्पून त्यांनीं जें गणेशशारदावंदन केलें आहे, त्याव-रून निर्गुणांतच सगुण पाहण्याच्या त्यांच्या अद्वैतदृष्टीबरोबर अथवा ज्ञानोत्तर भक्तीच्या त्यांच्या पुरस्कारावरोबरच ग्रंथारंभीं समुचित इष्टदेवतेला नमन करण्याच्या पूर्वकवींच्या प्रथेचें त्यांनीं केलेलें अनुकरण त्यांच्या पूर्वपरंपरा-भिमानाचेंच द्योतक मानलें पाहिजे. ज्ञानेश्वरांचा शब्दब्रह्मरूपी सहा हातांचा गणेश, आपल्या नित्याच्या चतुर्भुज गणेशाहून भिन्न आहे हें खरें

असलें, तरी त्या गणेशाच्या भिन्न भिन्न अलंकारांच्या जागीं अष्टादश पुराणें व काव्यनाटकें, किंवा त्याच्या निरनिराळ्या अवयवांच्या स्थानीं षड्दर्शनें व तर्कमीमांसादि शास्त्रें, यांच्या योजनेबरोबरच शेवटीं त्याच्या मुकुटावरील कुसुमांच्या जागीं जी दशोपनिषदांची स्थापना झाली आहे, तिच्यावरून ज्ञानेश्वरांचा या विविध शास्त्रांबद्दलचा नितांत आदर जितका व्यक्त झाला आहे, तितकीच दशोपनिषत्प्रणीत अद्वैत तत्वज्ञानाला सर्वांत मूर्धाभिषिक्त मानण्यांत त्यांची विशिष्ट मतप्रणालीच स्पष्ट झाली आहे. ज्ञानेश्वरांचें शारदावंदन देखील वाणीच्या अद्भुत, विश्वमोहक व कलाविलासात्मक स्वरूपाचाच गौरव असून, त्यांनीं केलेलें गुरुवंदन तर त्यांच्या निःस्वार्थी-पणाचें, विनयाचें व अत्युच्च संस्कृतीचें गमक होय. निवृत्तिनाथ हे ज्ञानेश्वरांचे जसे गुरु होते, तसेंच त्यांचे ज्येष्ठ बंधूही असल्यानें, जिव्हाळ्याच्या कौटुंबिक नात्याचा व अध्यात्मिक गुरुशिष्यसंबंधाचा येथे जो असामान्य संयोग झाला आहे, त्यामुळेंच ज्ञानेश्वरांच्या तोंडून निवृत्तिनाथाबद्दल इतक्या उत्कट कृतज्ञतेचे सहजोद्गार बाहेर पडले आहेत. याप्रसंगीं त्यांनीं अंजन-पायाळूचा अथवा चिंतामणि हातीं लागलेल्या माणसाचा जो दृष्टांत येथे मोठ्या रसिकतेनें व मार्मिकतेनें योजला आहे, तो तर इतका औचित्यपूर्ण आहे कीं, विशिष्ट प्रकारचें अंजन डोळ्यांत घातलेल्या पायाळूला जसा भूमिगत द्रव्याचा ठेवा अचानक दृष्टीला पडावा, किंवा चिंतामणि हातीं पडलेल्या माणसाचे सर्व मनोरथ जसे पूर्ण व्हावे, त्याप्रमाणें निवृत्तिनाथासारखे अधिकारसंपन्न गुरु घरच्या घरीं लाभल्यामुळें, त्यांनाही परब्रह्मसुखाचा दुर्लभ ठेवा सहजच प्राप्त झाल्याचें त्यावरून ध्वनित केलें जावें ! ज्ञानेश्वर हे नाथपंथीयें असल्यानें, गुरुभक्ति हा जरी त्या पंथाचा एक उल्लेखनीय विशेष असला, तरी येथे निवृत्तिनाथांना वंदन करण्यांत केवळ त्या पंथाची एक मर्यादा पाळण्याचाच ज्ञानेश्वरांचा हेतु नसून, सर्वसाधारण गुरुकृपेबद्दलचा आपला आदरभाव व कृतज्ञता आपल्याकडे दुसरें कसलेंही श्रेय न घेतां व्यक्त करण्याचाच [illegible] असावा.

यानंतर महाभारत, महाभारतकार व्यासमहर्षि व श्रीमद्भगवद्गीता यांची महति गाण्यांत सुद्धां टीकाविषयीभूत ग्रंथाबद्दलची आपली प्रीति व सहानुभुति त्यांनी फार प्रसन्न पण भव्योदात्त शब्दांत मांडली असून, गेलीं हजारों वर्षे महाभारतानें बजावलेली सांस्कृतिक कामगिरी, त्यानें कालिदासादि महाकवीनांही दिलेली काव्यस्फूर्ति, भारतीयांच्या मनावर त्यानें पाडलेली विलक्षण छाप लक्षांत घेतल्यास, अशा या विश्वकोशात्मक ग्रंथास महाकाव्यांचा राजा, ग्रंथगौरवाचें मूलस्थान, पुराणआख्यानादिकांचें आश्रयस्थान, शारदेच्या लावण्याचें भांडार, सर्वधर्मांचें माहेरघर, परमार्थाची जन्मभूमि अशा शेलक्या साभिप्राय अभिधानांनी गौरविण्यांत ज्ञानेश्वरांनीं मुळींच अतिशयोक्ति किंवा अर्थवाद केलेला नाहीं हें उघड दिसतें. महाभारतग्रंथांत शहाण्यांना देखील शिकण्यासारखें कसें पुष्कळ आहे, शृंगारादि नवरसांचा देखील तेथे कसा प्रकर्ष झाला आहे, माधुर्यादि काव्यगुणांना तेथे कशी उत्कटता प्राप्त झाली आहे व कलेलाही तेथे कलाविदपण येऊन पुण्याचाही प्रताप कसा वाढला आहे, हें मोठ्या-आपुलकीनें सांगतांना, ज्ञानेश्वरांनीं आपण महाभारताचें बहुत साक्षेपानें केलेलें परिशीलन अथवा आपला महाभारताचा दृढपरिचयच येथे सूचित केला असून, व्यासप्रतिभेचा स्पर्श झालेली कोणतीही वस्तु, सूर्यतेजानें उज्ज्वल होणाऱ्या त्रैलोक्याप्रमाणें शोभायमान दिसतें असें म्हणतांना, किंवा 'व्यासोच्छिष्टं जगत्रयं' अशा रूढ वचनाचा अथवा 'भारतांत नाहीं तें तिन्हीं लोकांत कोठेंच नाहीं' अशा सुप्रसिद्ध लोकोक्तीचा पुनरपि अनुवाद करतांना, त्यांनी व्यासांच्या दिव्य व तेजस्वी प्रतिभेला जें भक्तियुक्त अंतःकरणानें अभिवादन केलें आहे, त्यांतच त्यांच्या प्रांजल व निर्मत्सर बुद्धीची व पूर्वसूरीबद्दल त्यांना वाटत असलेल्या परंपरागत अभिमानाची साक्ष पटते. अशा या महाभारतरूपी कमलाचा परागच जणु असा हा श्रीकृष्णार्जुनसंवादयुक्त श्रीमद्भगवद्गीतेचा प्रसंग यापुढें वर्णन करतांना तर, ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेला बहर आला असून, गीतेला

शब्दब्रह्माब्धि घुसळून काढलेलें नवनीत म्हणण्यांत, व्यासांच्या वेदमंथनाच्या चिरस्मरणीय कार्याचाच त्यांनीं येथे गौरवपूर्ण उल्लेख केला आहे हें निःसंशय. याच गीतारूपी नवनीताचें ज्ञानाग्नीच्या संपर्कानें उत्तम साजुक तुपांत रूपांतर होऊन त्याचाच आमोद सर्वत्र दरवळून राहिला आहे असें याहीपुढें पुनः सांगण्यांत, त्यांनीं गीतेचें सर्वमान्यत्वच जाहीर केलें असून, भक्त, संत, विरक्त व पारंगत अशा भिन्न भिन्न अधिकाराच्या व्यक्तींना सारखीच प्रिय झालेल्या या भीष्मपर्वांतर्गत त्रिजगदाभिनंदिनी श्रीमद्भगवद्गीतेवरच आतां व्याख्यान केलें जाईल असा आपला प्रस्ताव शेवटीं त्यांनीं श्रोत्यांपुढें करून ठेवला आहे.

पण याहीपेक्षां आपलें गीताव्याख्यान अत्यंत हळुवारपणानें एकतानतेनें व अनन्यभावानें श्रवण करावें अशी आपल्या श्रोत्यांपासून अपेक्षा करतांना ज्ञानेश्वरांनीं शारदीयचंद्रकलेतील कोंवळे अमृतकण मवाळ मनानें वेंचणाऱ्या चकोर तलगांचा, कमलदलांना कसलीही जाणीव करून न देतां त्यांतील पराग नेणाऱ्या भ्रमरांचा, व आपलें स्थान न सोडतां चंद्रोदय होतांच त्याला मनोभावानें आलिंगन देणाऱ्या कुमुदिनीचा, असे एकामागून एक जे अत्यंत भावपूर्ण व काव्यमय दृष्टांत दिले आहेत, त्यांवरून तर त्यांच्या हळुवार, प्रसिद्धिविन्मुख, व ध्येयाशीं एकाग्र व एकनिष्ठ असणाऱ्या सुस्थिर मनाचा प्रत्यय आल्यावांचून राहत नाहीं. आपलें व्याख्यान सर्वस्वी श्रोत्यांच्या सहानुभूतिपूर्वक अवधानावर अवलंबून आहे हें चतुरतेनें जाणुनच ज्ञानेश्वर नेहमींच त्यांची अशा सलगीनें विनवणी करतांना दिसतात कीं, अशा प्रसंगीं त्यांनीं श्रोत्यांकडे दिलेली मायबापांची व आपल्याकडे घेतलेली बोबडें बोलणाऱ्या अपत्याची भूमिका, त्यांच्या मूळच्या विनम्र स्वभावाला फारच खुलून दिसावी ! त्यांतूनही पुनः गीताशास्त्रासारख्या अवघड विषयाला आपण हात घालणें म्हणजे टिटवीनें आपल्या इवल्याशा चोंचीनें समुद्रांत पाण्याचें माप टाकण्यासारखें, किंवा मशकानें आकाशच

आपल्या मुठींत घेण्यासारखें हास्यास्पद होय, असें जेव्हां ते प्रांजलपणें म्हणतात, तेव्हां आपलें रघुवंश हें महाकाव्य रचावयास उद्युक्त होतांना 'तितीर्षुर्दुस्तरं मोहादुडुपेनास्मि सागरम्' असें मोठ्या विनयानें म्हणणाऱ्या महाकवि कुलगुरु कालिदासाइतकेच ते अभिजातवृत्तीचे असावे अशी खात्री पटते. खरा प्रतिभासंपन्न व जन्मजात कवि कसा विनयशाली व निगर्वी असतो याचें ज्ञानेश्वरमहाराज हे एक स्पष्ट निदर्शन असून, आपल्या महान् कवित्वाचें सर्व श्रेय आपल्या गुरूंस व संतकृपेला देतांना व आपल्या ग्रंथांत न्यून पडेल तें पुरतें करून घेण्याची व अधिक होईल तें मान्य करून घेण्याची श्रोत्यांना विनंति करतांना, 'विद्या विनयेन शोभते' हा न्याय त्यांनीं अगदीं कसा सार्थ करून दाखविला आहे ! ज्ञानेश्वरांसारख्या अध्यात्मिक अधिकाराच्या साक्षात्कारी पुरुषांत व वारकरी संप्रदायांतील महान् ज्ञानीभक्तांत, गुरुभक्ति, विनय, शास्त्रांबद्दल व पूर्वसूरींबद्दल आदर, मनाचा प्रांजळपणा व हळुवारपणा इत्यादि आर्यसंस्कृतीचे उच्चतम गुण वसत असणें, हें सुवर्णाला सुवास असण्याइतकें स्पृहणीय पण दुर्लभतर असून, या गुणसंनिवेशामुळेंच त्यांच्या अलौकिक व अनुपम व्यक्तित्वाचा ठसा त्यांच्या सर्वमान्य ग्रंथाच्या द्वारां वाचकांवर आजकाल उमटून राहिला आहे.

## ज्ञानेश्वरांच्या टीकेचें धोरण

तथापि श्रीमद्भगवद्गीतेवर टीका करतांना मूळ भगवद्गीतेंतील शद्वाला शद्व ठेऊन अगदीं मोजकाच तेवढा शद्वार्थ सांगण्याचें एकाद्या सामान्य टिप्पणीकाराचें संकुचित धोरण ज्ञानेश्वरांनीं येथें अवलंबिलें नसून, श्लोकांचा मागील पुढील संदर्भ, काव्यगत व्यक्तींचे परस्परांशीं असणारे हिताहितसंबंध व आपलें विशिष्ट तत्त्वज्ञान लक्षांत घेऊन आपलें ज्ञानभक्तीचें तत्त्व स्फुट करून सांगतांना, मूळ संहितेंतील शब्दांना

आपणास अनुकूल अशा अर्थाची योग्य ती मुरड घालण्याचें व कित्येक स्थळीं मुळांत नसलेला किती तरी आशय अथवा भावार्थ आपल्या ग्रंथ-विस्तारानें व्यक्त करण्याचें, एखाद्या स्वतंत्र भाष्यकाराचें व्यापक धोरण त्यांनीं येथें स्वीकारलें आहे. प्रस्तुत अध्यायाच्या दुसऱ्याच श्लोकांत वास्तविक “ पांडवांची सेना सुसज्ज झालेली पाहून दुर्योधन द्रोणाचार्यांकडे येऊन पुढीलप्रमाणें बोलला ’ एवढाच अर्थ विवक्षित असतां, ज्ञानेश्व-रांनीं महाभारतांर्गत दुर्योधनाचा मत्सरी स्वभाव व त्याचें पांडवाशीं असणारें वैर लक्षांत घेऊन “ एखादा सिंह गजसमूहाला जसा जुमानीत नाहीं, तसाच दुर्योधनानें त्या पांडवसैन्याचा केवढा तरी अव्हेर केला[1], ” अशा गीतेंत नसलेल्या भावार्थाची पुस्ती जोडली असून, वाचकांचीं मनें पांडवाबद्दल अनुकूल व दुर्योधनाबद्दल प्रतिकूल करून ठेविलीं आहेत. पुढें दहाव्या श्लोकावरील व्याख्यानांतही भीष्माच्या सेनापतित्वाखालील आपल्या अपरंपार व भीमाच्या आधिपत्याखालील पांडवांच्या अगदींच अत्यल्प सैन्याचा उल्लेख करतांना, दुर्योधनाच्या तोंडीं भीमसेनाबद्दल तिरस्कारानें जे उद्गार[2] ज्ञानेश्वरांनीं मुळांत नसतानांही योजले आहेत, त्यावरून दुर्योधनाला एका विशिष्ट खलपुरुषाच्या भूमिकेंत वाचकांपुढें उभा करण्याचें तंत्र, त्यांनीं आपल्या ग्रंथांत सर्वत्रच अंगीकारल्याचें दिसून येतें. पुनः कृष्णभक्ति हा तर भागवतसंप्रदायाचा एक विशेष असल्यामुळें, ज्ञानेश्वरासारख्या भग-वद्भक्तानें श्रीकृष्णप्रणीत भगवद्गीतेवर व्याख्यान करतांना, श्रीकृष्णभक्तीचा गौरव करण्याची संधि आपल्या कल्पकतेची भर घालूनही मिळेल तेथें साधावी, यांत कांहींच नवल नव्हतें. ज्ञानेश्वरांनीं येथे अर्जुनरथवर्णन-प्रसंगीं “ चार शुभ्र घोड्यांच्या रथांत बसून कृष्णार्जुनांनीं आपापले दिव्य शंख वाजविल्याचा ” उल्लेख करतांना, ‘ वैकुंठाचा राजा आपणहून ज्यावर सारथी झाला आहे, ’ व “ मूर्तिमंत शंकर असा हनुमान्

---

१ ज्ञाने-१।९२. २ ज्ञाने--१।१२०.

ज्याच्या ध्वजावर बसला आहे " अशीं साभिप्राय विशेषणें[1] योजून अर्जुनाच्या रथवर्णनालाच अधिक महत्त्व दिलें असून, पार्थाचें सारथ्य करण्यांत भगवंताचा भक्तप्रेमाचा जो हेतु स्वतंत्रपणें उध्दृत केला आहे, तो ज्ञानेश्वरांच्या मनांत यावेळीं उचंबळलेल्या श्रीकृष्णभक्तीचाच द्योतक होय, असें समजलें पाहिजे. पण याहीपेक्षां मुळांत थोडा देखील तसा अवसर नसतांना, केवळ भगवंतांचें महात्म्य वर्णन करण्यासाठींच, गीतेंतील श्लोकांना ज्ञानेश्वरांनीं भलतीच मुरड घातल्याचीं जीं उदाहरणें येथें देण्यासारखीं आहेत, त्यांत प्रस्तुत अध्यायाच्या २५ व्या श्लोकावरील व ३६ व्या श्लोकावरील त्यांचें भाष्य विशेषच लक्षांत घेण्यासारखें आहे. कारण पंचविसाव्या श्लोकांत खरें पाहिलें असतां " हे पार्था! युद्धासाठीं जमलेले हे कौरव पहा " असें श्रीकृष्णानींच अर्जुनाला म्हटलेलें असतां, ज्ञानेश्वरांनीं मात्र उलट अर्जुनच वरील वाक्य श्रीकृष्णांना सांगत असल्याचा जो व्यत्यासाचा स्वकपोलकल्पित प्रसंग[2] वर्णिला आहे तो अर्जुनाचें भाषण ऐकून श्रीकृष्णाच्या मनांत क्षणभर विस्मय उत्पन्न व्हावा, व त्यांनी पुढील ' से ' घेतल्यानें मग ज्ञानेश्वरांनाही तो ' हृदयस्थ ' असल्याचें मोठ्या भक्तीनें वर्णन करतां यावें, यासाठींच होय, यांत मुळींच शंका नाहीं. पुनः छत्तिसाव्या श्लोकाच्या ' का प्रीतिः ' या पदावर व्याख्यान करतांना सुध्दां, ज्ञानेश्वरांनीं अर्जुनाच्या तोंडून कृष्णभक्ति वदविण्याच्या मिषानें असाच कृष्णभक्तीचा आपला मोका साधला असून, ' का प्रीतिः ' याचा ' कौरवांना मारून आम्हीं काय असें मिळविणार आहो! ' हा सर्वसाधारण व साधा अर्थ बाजूला ठेऊन, त्याच्यावर " कौरवांना मारण्याचें पाप आम्हीं केल्यावर कृष्णा! तुझें मुख तरी आम्हांला दिसेल काय ? " किंवा ' तूं आम्हांला मग कुठला दिसायला ? ' अशा कृष्णभक्तिपर अर्थाचा जो साज त्यांनीं बुध्द्याच चढविला आहे, त्याला मुळांत कुठें तरी आधार मिळण्यासारखा आहे काय ?

---

१ ज्ञानेश्वर १।१४०--१४२. २ ज्ञाने--१।७६--७९.

आपल्या टीकेंतील विवेचनानें प्रसंगविशेषीं श्रोत्यांच्या अथवा वाचकांच्या अनुकूलप्रतिकूल भावनेला योग्य तें वळण मिळावें, किंवा आपल्या भागवत-संप्रदायानुसार कृष्णभक्तीचें संकीर्तनही करण्याची संधि आपणास मिळावी, अथवा आपल्या नाथपंथाच्या तत्त्वानुसार हठयोगाचा पुरस्कारही आपणास जागजागीं करतां यावा, या अनेक हेतूंनीं प्रेरित होऊन ज्ञानेश्वरांनीं मूळ गीतेच्या पदाच्या अर्थांत जसे महत्त्वाचे फेरफार केले आहेत, तसाच मुळाहूनही अधिक असा आशय व्यक्त करण्यासाठीं, ठिकठिकाणीं ग्रंथ-विस्तारही बहुत केला आहे. ज्ञानेश्वरीच्या या स्वतंत्र व तिच्या कर्त्याचें व्यक्तित्व दिग्दर्शित करणाऱ्या भागांमुळेच, ती दामोपंतांच्या अवाढव्य 'गीतार्णवा'हून किंवा वामनपंडितांच्या तर्ककर्कश व मुळाला चिकटून बसणाऱ्या वस्तुनिष्ठ 'यथार्थदीपिके'हून अगदीं वेगळी भासत असून, तिच्या असामान्य लोकप्रियतेचें रहस्यही यांतच आहे.

## ज्ञानेश्वरांचें कवित्व

आतां ज्ञानेश्वरांच्या या ग्रंथविस्ताराला वर सांगितल्याप्रमाणें जरी दुसरीं अनेक कारणें असलीं, तरी त्यांची अभिजात रसिकवृत्ति व काव्यात्मकताच या विस्तारानें एक प्रमुख कारण असल्याची प्रतीति, प्रस्तुत अध्यायांत ज्या प्रमाणांत आपणास येते, त्या प्रमाणांत ती ज्ञानेश्वरीच्या इतर अध्यायांत क्वचितच येऊं शकेल. कारण ज्ञानेश्वरींत इतरत्र कर्म, योग, ज्ञान व भक्ति इत्यादि परमार्थाच्या मार्गांचें विवेचन करताना, विषयाच्या तात्त्विक स्वरूपा-मुळें आपल्या प्रतिभेला जी थोडीबहुत मुरसणी ज्ञानेश्वराना घालावी लागली आहे, तिला प्रस्तुत अध्यायांतील वस्तुवर्णनात्मक व भावमंथर अशा विष-यामुळें अनिरुद्ध संचार करण्यास बरीच मुभा मिळाली आहे असें स्पष्ट दिसतें. शिवाय या अध्यायाचा प्रारंभच मुळीं कौरवपांडवांच्या सैन्यसमु-दायानें व रणवाद्यांच्या धुमाळीनें होऊन, त्याचा शेवट अर्जुनासारख्या

वीराच्या करुणार्द्रविषादानें होत असल्यानें, ज्ञानेश्वरांच्या उत्तुंग कल्पनाविलासाला व सखोल भावनेला येथे सहजच उधाण यावें यांत नवल नाहीं. येथें तर कोणत्याही धीरगंभीर अथवा रौद्र स्वरूपाच्या वस्तूचें वर्णन करतांना, ज्ञानेश्वर भव्योदात्त रूपकाप्रमाणेंच नितांत विस्मयकारक अशा उत्प्रेक्षाही कशा योजतात, हें प्रस्तुत अध्यायाच्या पांडवसैन्यवर्णनांत[1] जसें प्रत्ययास येतें, तसेंच तें अर्जुनरथवर्णनप्रसंगींही[2] उमगून आल्याशिवाय राहत नाहीं. त्यातूनही पुनः पांडवसैन्याला जणुकाय प्रलयवायूनें पुष्ट झालेला वडवानळ अथवा शुष्क होऊन आकाशाला उडालेला सागर असें कल्पून, त्याचें प्रचंडत्व व भीषणत्व त्यांनी वाचकांच्या मनावर फारच कौशल्यानें बिंबविलें आहे. पुढें अर्जुनाच्या रथाला सुद्धां जणु काय पंखाचा मेरुपर्वत म्हणण्यांत ज्ञानेश्वरांच्या कल्पकतेनें उच्चांक गाठला असून, या एकाच पण अत्यंत प्रभावी उत्प्रेक्षेनें, तो सोन्याचा प्रचंड वेगवान् रथ त्यांनीं आमच्यापुढें अगदी त्याच्या मूळच्या झळझळीत स्वरूपांत कसा मूर्तिमंत उभा केला आहे ! याशिवाय कोणत्याही घटनेचा दूरगामी व तीव्रतर परिणाम वर्णन करतांना, नेहमींच अतिशयोक्ति अलंकाराचा अवलंब करण्याचा ज्ञानेश्वरांचा परिपाठ असून, तो त्यांनीं प्रस्तुत अध्यायांतील पांडवांच्या शंखनादवर्णनप्रसंगींही[3] अनुसरलेला दिसतो. येथे देखील पांडवांच्या त्या एकसमयावच्छेदानें झालेल्या शंखनादानें तिन्ही लोक दणाणून गेले, मेरुमंदार डळमळले, समुद्रजल आकाशापर्यंत उसळलें, पृथ्वी डळमळली, आकाश हादरलें व नक्षत्रांचा सडा पडला, असें अतिशयोक्त अद्‌भुत वर्णन करून ज्ञानेश्वरांनीं त्या नादाच्या प्रदीर्घतेबरोबरच त्याचा सत्यलोकावर झालेला सर्वोदोलक परिणामही सूचित करून, वाचकांचीं मनें कशीं स्तिमित व स्तंभित करून टाकलीं आहेत !

१ ज्ञाने-१।८८-९२. २ ज्ञाने-१।१३८-१४२. ३ ज्ञाने—१।१५४-१६६.

पण याहीपेक्षां रणांगणावर आपलेच स्वजन आपल्याशी लढण्यास सज्ज झालेले पाहून, अर्जुनाच्या मनांत करुणेनें पाऊल घालतांच त्याच्या वीरवृत्तीनें आपलें पाऊल कसें बाहेर टाकलें, हें अत्यंत जिव्हाळ्यानें वर्णन करून सांगतांना, ज्ञानेश्वरांनीं सवतीचें अस्तित्व सहन न करणाऱ्या लावण्यवती व तेजस्विनी कुलस्त्रीचा[1], व नवीन स्त्रीच्या मोहांत सांपडून घरांतल्या धर्मपत्नीला विसरणाऱ्या कामुक माणसाचा[2], असे जे अर्जुनाच्या अनुक्रमें वीरवृत्तीला व कारुण्यवृत्तीला अनुलक्षून मार्मिक पण अत्यंत अनुरूप असे कौटुंबिक दृष्टांत दिले आहेत, त्यावरून अर्जुनाच्या कारुण्यवृत्तीचा ज्ञानेश्वरकृत सूक्ष्म निषेध जसा सूचित झाला आहे, तसेंच समाजांतील विविधप्रकारच्या स्त्रीपुरुषसंबंधाचें त्यांचें सूक्ष्मावलोकनही आपाततःच व्यक्त झालेलें आहे. तसेंच पुढें अर्जुनाच्या अंगांतील होता नव्हता धीर गळून जाऊन त्याच्या अंतःकरणाला दयेचा पाझर कसा फुटला, हें पटवून देतांना, त्यांनीं पुनः चंद्रकिरणांनीं द्रवणाऱ्या चंद्रकांतमण्याचा जो एकच पण अर्जुनासारख्या भावनाप्रधान माणसाला साजेसा दृष्टांत[3] योजला आहे, त्यावरून अर्जुनासारख्या भगवद्भक्ताबद्दलची त्यांची आपुलकीच अधिक स्पष्ट झाली आहे. त्यांतूनही पुनः अर्जुनाच्या मनांत उत्पन्न झालेल्या स्वजनस्नेहाचें अद्भुत सामर्थ्य वर्णन करतांना देखील, त्यांनीं एकीकडे काष्ठ पोखरण्यासारखें कठिण कार्य करणाऱ्या पण दुसरीकडे कमलकोशासारखी अत्यंत मृदु वस्तु केवळ स्नेहाखातर फोडतां न आल्यामुळें, कमलकोशांतच आपल्या प्राणाची आहुती देणाऱ्या भ्रमराचा, जो अत्यंत समर्पक व वाचकांच्या सूक्ष्म व सात्विक भावनांना आवाहन करणारा दृष्टांत[4] दिला आहे, तो तर इतका परिणामकारक झाला आहे कीं, त्यावरून अर्जुनाबरोबरच ज्ञानेश्वरांच्या अतीव सुकोमल अंतःकरणाची साक्ष पटून, ' वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमा-

---

१ ज्ञाने—१।१८६. २ ज्ञाने—१।१८७. ३. ज्ञाने—१।१९१. ४ ज्ञाने-१।२०१.

दपि । लोकोत्तराणां चेतांसि को हि विज्ञातुमर्हति ' या भवभूतिप्रणीत सिद्धांताचा साक्षात् प्रत्यय वाचकांना पटावा ! शेवटीं तर न लढण्याचा निश्चय झाल्यामुळें आपलें धनुष्यबाण टाकून रथांत स्वस्थ बसणाऱ्या, पण उद्वेगलेल्या व गहिंवरलेल्या अर्जुनाचें शब्दचित्र हुबेहूब आमच्यापुढें मांडतांना, ज्ञानेश्वरांनीं त्याला राज्यपदभ्रष्टतेमुळें तेजोहीन होत्सात्या राजकुमाराची व राहुग्रस्त रविबिंबाची जी करुणमव्योदात्त उपमा[1] योजली आहे, त्यावरून अर्जुनासारख्या वीराच्या अंगच्या मूळ सामर्थ्याची व विषादानें ग्रासल्यामुळें त्याला आलेल्या अवकळेची वाचकांना पुरेपूर कल्पना आल्यानें, त्यांचीही मनें मग कांही काळ विषण्ण झाल्याशिवाय राहत नाहींत.

तथापि प्रस्तुत अध्यायाचें स्वरूपच याप्रमाणें थोडेंफार वर्णनात्मक व स्वभावस्थितिनिदर्शक असल्यामुळें, रूपक, उत्प्रेक्षा अतिशयोक्ति व दृष्टांत यासारख्या, वर्ण्यवस्तूंना अधिक स्पष्टतेनें चित्रित करणाऱ्या व मानवी भावनांची विविध आंदोलनें अधिक तीव्रतेनें व्यक्त करणाऱ्या मोजक्या अलंकारांनाच येथे स्थान मिळालें असलें, तरी लौकिक समजुतीप्रमाणें कविसंकेतांनाही ज्ञानेश्वरांनीं आपल्या ग्रंथांत ठिकठिकाणीं समावेश केला आहे. अंजन-पाताळ, चकोर-चंद्रिका, चंद्र-कुमुदिनी, टिटवी-समुद्र, भ्रमर-कलिका, भानु-खद्योत, परिस-लोह, तसेंच चिंतामणि, कामधेनु, कल्पवृक्ष इत्यादि अनेक कविसमयांची त्यांनीं यथेच्छ पेरणी केली असल्यामुळें, त्यांच्या उपमा दृष्टांतांना विविधता व वैचित्र्य प्राप्त झालें आहे. तशांत आपलें विवेचन पटवून देण्यासाठीं, कित्येक स्थलीं लौकिकन्यायांची[2] तर कित्येक जागीं लोकोक्तींची[3] व पौराणिक उल्लेखांची[4] योजना करून ज्ञानेश्वरांनीं आपल्या सूक्ष्मावलोकनाची व समाजनिरीक्षणाचीही प्रतीति आणून दिली आहे. ज्ञानेश्वरांचे उपमानभूत विषय

---

१ ज्ञाने--१।२६८. २ ज्ञाने—१।२४२, २४६. ३ ज्ञाने—१।२१७, २५०. ४ ज्ञाने—१।२००.

नेहमीच गंगा, सागर, चंद्र, चंद्रिका, सूर्य, चिंतामणी, अमृत, सोमकांत, कल्पवृक्ष असे विशाल, व्यापक व प्रसन्न असल्यामुळे, त्यांच्या उपमादृष्टांतरूपकांनीं मंडित झालेलीं स्थलें व प्रसंग, वाचकांचीं हृदयामध्येंच होऊन बसतात. ज्ञानेश्वरीच्या काव्यांगाचा हा एक महनीय विशेष असून, वामनपंडितांच्या शुक्ति —रजत, रज्जु —सर्प, किंवा तंतु—पट अशा रूक्ष दृष्टांतांच्या तुलनेनें तर ज्ञानेश्वरांच्या दृष्टांतांचें हृदयंगमत्व अधिकच मनांत भरतें. शिवाय सुष्ट वस्तूंच्या वर्णनांत सुष्ट, व दुष्ट वस्तूंच्या वर्णनांत दुष्ट उपमेयोपमेयांची अचूक योजना करतांना, ज्ञानेश्वर वाचकांचीं मनें विवक्षित विषयासंबंधीं अनुकूल अगर प्रतिकूल करून तर घेतातच, पण तत्संबंधीं आपला अभिप्रायही पर्यायानें सूचित करण्यास ते चुकत नाहींत. नाहीं तर कुलस्त्रिया बिघडल्या असतां महापापें कुलांत कशीं प्रवेश करतात, याबद्दलची आपली घृणा त्यांनीं त्या कुलाला, चव्हाट्यावर टाकलेल्या काकबलीची व महापापांना कावळ्यासारख्या निंद्य पक्ष्यांची उपमा[1] देऊन कां व्यक्त केली असती ?

या वरील अर्थालंकारांप्रमाणेंच ज्ञानेश्वरींत आढळणारे शब्दालंकारही ज्ञानेश्वरांनीं कांहीं उगीच योजायचे म्हणून योजले नसून, ते त्यांच्या मुखांतून व्याख्यानाच्या भरांत सहजगत्या साधले गेले आहेत. त्यांच्या रचनेंत "तेसें दल दुर्धर । नाना व्यूहीं परिकर । आवरलें भयासुर । तियेकाळीं[2] ॥" किंवा "तेणें महाघोषगजरें । दुमदुमिति गिरिदरें । तंव दलामाजि रणतुरें । आस्फालिलीं[3] ॥" अशा यमकानुप्रासांची जी थोडी सजावट आपणास जागजागीं दृष्टीस पडते, ती विषयानुरोधानें झाली आहे, हें सामान्य वाचकांच्या ध्यानांत येत नाहीं. तथापि ज्ञानेश्वरांची खरी प्रवृत्तिच नादमधुर व अर्थानुकूल अक्षररचनेकडे असून, वाचकांच्या चित्ताला मोहविणारीं व वर्ण्यविषयाला खुलविणारीं मृदु व सानुस्वार अक्षरें, त्यांच्याकडे वसंतागमीं येणाऱ्या नव्या नव्या पालवांप्रमाणें कशीं अगदीं

---

१ ज्ञाने—१।२५०. २ ज्ञाने-१।११. ३ ज्ञाने-१।१३०.

धांवत येतात ! तेंच पहायला गेलें तर " आतां अभिनववाग्विलासिनी ॥ जि चातुर्यकलाकामिनी । ते शारदा विश्वमोहिनी । नमिली मियां[1] ॥ " अथवा " जैसे शारदियेचे चंद्रकळे । माजि अमृतकण कोवळे । ते वेंचिति मनें मोआळें । चकोरतलगें[2] ॥ " अशा कितेक ओव्यांत ज्ञानेश्वरीच्या मधुर व प्रसन्न भाषाशैलीची गोडी चाखतां येण्यासारखी आहे. याच माधुर्याला पोषक म्हणून शब्दांच्या अंतीचे उकार, एकार व ओकार अथवा वर्णागम करण्याची तत्कालीन भाषेची लकब, त्याना आपल्या भाषेत कौशल्यता साधण्यास साहजिकच मोठी उपकारक झाली आहे. तथापि माधुर्याप्रमाणेंच प्रसाद हा ज्ञानेश्वरीचा एक अनन्यसाधारण गुण असून, त्याचा अनुभव प्रस्तुत प्रथमाध्यायांतही वाचकाला सर्वत्र येण्यासारखा आहे. शिवाय आपला टीकाग्रंथ संस्कृतानभिज्ञ बहुजनसमाजाला सुबोध व्हावा, यासाठींच ज्ञानेश्वरांनीं त्यांत स्वकालीन व्यवहारांतल्या शद्बांचा व म्हणी-संप्रदायांचा भरपूर समावेश केला आहे. पण म्हणून ओज या तिसऱ्या काव्यगुणाचा ज्ञानेश्वरींत अगदी अभाव आहे, असें मात्र समजण्याचें कारण नाहीं. कारण जेथें जेथें म्हणून एखाद्या प्रचंड सैन्याच्या भीषणत्वाचें व घातकपणाचें अथवा पांडवांच्या संयुक्त शंखनादाच्या हृदयविदारक परिणामासारखें वर्णन ज्ञानेश्वराना करावयाचें असतें, तेथे तेथे त्यांच्या भाषाशैलीनें स्वभावतः ओजस्वी स्वरूप धारण केलें आहे. येथे " तेणें तें घनदाट । उठावलें एकावट । जैसें उलंडलें कालकूट । धरी करण[3] " ॥ किंवा " तेथ तीन्ही लोक डंडलित । मेरुमंदार आंदोलत । समुद्रजल उसळत । आकाशवेन्ही[4] ॥ पृथिवीतल उलंडो पांत । आकाश असे अडदरत । तेथ राशीमा होत । नक्षत्राचा[5] ॥ " अशा ओव्यांतील कठोर व्यंजनाच्या विशिष्ट नादामुळें, वर्ण्यविषयाचा मूळ आशय कोणाला विदित होणार नाहीं !

---

१ ज्ञाने-११२१. २ ज्ञाने--११५६. ३ ज्ञाने-११८९. ४ ज्ञाने- ११११६. ५ ज्ञाने—१११५६.

यावरून वर्ण्यविषयाबद्दलचा जिव्हाळा व त्याशीं होणारें तादात्म्य हेंच ज्ञानेश्वरांच्या काव्यकलेचें खरें रहस्य होय. ज्ञानेश्वरांची नादमधुर व अर्थानुरूप शब्दसंहति, त्यांनीं योजलेले समर्पक व मार्मिक उपमा-दृष्टांत, वर्ण्यविषय वाचकापुढें मूर्तिमंत उभी करणारीं किंवा त्यांचा गौरव करणारीं भव्योदात्त परंपरित रूपकें, व मनाचा विस्तार करणाऱ्या नवनवोन्मेषशालिनी उत्प्रेक्षा, वाचकाला एका अद्‌भुतरम्य वातावरणांत विहार करावयास लावतात; आणि मग तेथे पुनः ज्ञानेश्वरांच्या विनयलाघवपूर्ण विनम्रवृत्तीचा, त्यांच्या हळुवार व कोमल अंतःकरणाचा काव्यमय व रसिक अभिरुचीचा जागजागीं प्रत्यय आल्यानंतर तो त्यांच्या अनुपम व्यक्तित्वाशीं पूर्णतया समरसच होतो. अशी ही भावनाप्रधानताच ज्ञानेश्वरीचें खरें काव्यांग असून त्यामुळेंच 'भावार्थदीपिका' हें तिचें नामाभिधान यथार्थ झालें आहे.

## ज्ञानेश्वरीची भाषा

आतांपर्यंत केलेल्या या विवेचनाबरोबरच ज्ञानेश्वरीच्या भाषेचा व तत्कालीन समाजाचा कांहींसा विचार येथे करणें अस्थानीं होणार नाहीं असें वाटतें. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ यादवकालीन असल्यामुळें, मराठी भाषेच्या बहुविध रंगढंगांनीं नटलेल्या अशा या सांप्रतच्या परिपूर्ण स्वरूपांत तो निष्पन्न होण्यास, तत्पूर्वीचें बरेंच वाङ्मय कारणीभूत झालें असलें पाहिजे, हें आज उपलब्ध असलेले मराठी शिलालेख, 'रत्नमाले' सारखीं ज्योतिष व वैद्यकीय प्रकरणें, आणि आतां नुकतेंच कोठें उघडें झालेलें महानुभावी वाङ्मयाचें अज्ञात दालन, यांवरून सिद्ध होतें. ज्ञानेश्वरीची प्रमाणभूत म्हणजे ग्रंथकर्त्यांच्या अगदी हातची अशी प्रत आपल्यापुढें नसली, तरी तत्कालीन भाषेच्या व्याकरणावरून वरील वाङ्मयाच्या तुलनेनें तशी एक विश्वसनीय मानतां येण्यासारखी ज्ञानेश्वरीची प्रत तयार करणें अगदींच अशक्य नाहीं.

ज्ञानेश्वरीच्या भाषेंत ' कवतिकें ' ( कौतुकें ), वरिषताति (वर्षताति), सिहाणें ( शहाणें ) असा **वर्णागम**; कुमर ( कुमार ), ससुरे ( सासुरे ), कलूं ( कवलूं ), लगे ( लागे ) असा **वर्णनाश**; ' दिठी ' ( दृष्टि ), ' गोठी ' ( गोष्टि ) अशी **वर्णविकृति** झालेली आढळते. ' साच ' ( सत्य ), आथि (अस्ति), अशा शब्दांत शेवटच्या जोडाक्षरांतील एक अक्षर गळून उपांत्य स्वर दीर्घ झालेला असतो. ' पाहाट ' (प्रभात), गहिरें (गभीर), रहवर (रथवर), महूर (मधुर) अशा शद्बांत अनुक्रमें **भ थ** व **ध** बद्दल **ह** घालण्याचा प्रघात दिसतो. ' कीजे ' ( क्रियते ), ' दीजे ' ( दीयते ), ' काज ' ( कार्य ) अशा शब्दांत **य** बद्दल **ज** येतो, तर ' तीख ' ( तीक्ष्ण ), उन्मेख ( उन्मेष ); ' पोखलें ' ( पोषलें ) अशा शब्दांत **क्ष** व **ष** बद्दल **ख** झालेला आढळतो. ज्ञानेश्वर व महानुभाव यांच्या भाषेंतील लक्षांत राहण्यासारखा विशेष असा कीं, तिच्यांतील, सांघिजेल ( सांगिजेल ), धवडिजे ( दवडिजे ), यऱ्हविं ( येरवी ) अशा शब्दांतील मूळ अक्षरांत **ह**कार मिसळलेला असतो.

**नामांचे** अनेक प्रकार ज्ञानेश्वरींत पाहिले म्हणजे आपले जुने प्राकृत, संस्कृतोत्पन्न व कानडी, गुजराथी, हिंदी सारख्या शेजारच्या भाषांतून आलेले कितीतरी शब्द, आजच्या मराठी भाषेच्या प्रचारांतून नाहीसे झाले आहेत याची कांहींशी कल्पना येते. टेंव, खेवणें, पल्लवसडका, बसैठा, जिव्हार, कोवलिक, वीक, आगलिक, मातु, विवंसा, आडदर, बंबाळू, कातले, रहवर, रासौभा, मोकळवादि, से, हियें अशीं याच अध्यायांत अनेक उदाहरणें सहजीं सांपडतात. फार नाहीं तरी, केतुला, अनारिसें आन, कवण, सरिस, अशीं **सार्वनामिक विशेषणें** आज थोडीं अपरिचितच भासतात. साध्या **विशेषणांतही** चोख, वोखटें, मवाळ, साचार, वेधु, सखोल, अपाडे, थोकडें, सपूर, वरिष्ठिल, चांग, गहिर, भलतैसें, नागर, आगळें, अनारिसें, अशा आज जुन्या वाटणाऱ्यांचाच भरणा फार. सेविती परी, अघडती मातु, जूझती कुळकेणी, न धरत अश्रुपात, असतें पौरुष, अशी

**वर्तमानकालवाचक विशेषणें** संस्कृतच्या धर्तीवर गेलेलीं असून, 'आथिला' म्हणजे असलेला, युक्त, अशा अर्थी 'अस्' या धातूचें **भूतकालवाचक विशेषण** लावून तेजाथिलें, रंगाथिलें, असे शब्द बनविले जात.

**विभक्तिप्रत्ययांकडे** पाहिल्यास मोदकु, रावो, ठावो, विस्मो अशीं **प्रथमेचीं** एकवचनीं; व ज्ञानिये, पापिये, अशीं अनेकवचनीं रूपें आढळ. तात. रायातें, चित्ता, भारता अशीं **द्वितीयेचीं**, तर गुरुकृपा, अर्थध्वनि, संभ्रमेंसीं, निवृत्ती, भक्ती, जाणतेनि अशी तृतीयेचीं रूपें रूढ होतीं. तेयासि, आमोदासी, हीं **चतुर्थीचीं** व एथौनि अशीं **पंचमीचीं** रूपें तत्कालीन भाषेची कल्पना करून देतात. आमुचें, वज्राचेयां, माझें, पुण्याचा, अशा आजच्यासारखी **षष्ठीचीं** व मथिलेया, भीष्मपर्वीं, अशीं **सप्तमीचीं** रूपें नित्याचीच आहेत. या विभक्तींच्या प्रत्ययाबरोबरच कांहीं ठराविक अव्ययांनी विभक्तिप्रत्ययांचें काम भागविलें जाई. प्रतिष्ठे**लागि**, तुलिगा**सवें**, पतीवा**चौनि**, दला**माझि**, आदिला**पासौनि**, तुआं**वीण**, इया**वेग्हि** अशीं कित्येक उदाहरणें आज चमत्कारिक वाटण्यासारखीं आहेत.

**शब्दयोगी अव्ययांत** 'चि,' 'ही' यांचा, व **उभयान्वयी अव्ययांत** जे ( कारण ), म्हणौनि ( म्हणून ), वरि ( शिवाय, आणखी ) कीं ( जसा-तसा ), कां ( अथवा ), नातरि ( किंवा ), येणें नावें, ( यासंबंधीं ), हो काज ( फार काय, जणु काय ) इत्यादींचा समावेश झाला असून, पां, गा, अगा ! अशीं **केवलप्रयोगी** अव्ययेंही या यादवकालीन भाषेंत सांपडतात.

**क्रियापदांचा** पसारासुद्धां कांहीं लहान नाहीं. आथि, कीजे, देइजे, भजिजे, दीसती, म्हणिपति, सुरवाडणें, सांडुकणें, उपवणें, घरणें, जाइजति, अशा क्रियापदांबरोबरच आलौनि घळी, गेले असति, मिरवत असे, अशीं

धातुसाधितें व सहाय्यक्रियापदेंहीं योजलेलीं दिसतात. जेथे, नथरत, असे अकरणरूपी एकशब्दात्मक धातु, मुकेश्वराच्या कालापर्यंत सुद्धां चालत आलेले आहेत. संवादला, चमत्कारोनि, गवसणें, दुणावली, ढवळलें, उजळलें, अशा नामधातूंनीं तर थोडक्यांत पुष्कळ अर्थ व्यक्त करण्याची पद्धति स्वीकारलेली असून, अनुकरणात्मक धातूंत दुमदुमिति, दचकला, घडघडित, अशांचा समावेश झालेला आहे. ज्ञानेश्वरींत सहाय्य क्रियापदांचा उपयोग काल, प्रयोग, रूप दर्शविण्याकडे जसा केला जातो, तसाच तो जोरदारपणा व परिणामकारकता साधण्यासाठींही केलेला आहे. वर दिलेल्या सहाय्य क्रियापदांचा या दृष्टीनें विचार करण्यासारखा आहे.

**काळ व अर्थ** यांकडे वळल्यास, मिरवत असे, सेविती, भेटे, फुटे, दावी, नेणती, अशीं वर्तमानकाळचीं रूपें रीतिवर्तमानासारखीं वाटतात. अपेक्षिजे, अनुभविजे, आकर्णिजे, अशा कर्मकर्तरी रूपांपुढेंच 'एल्' जोडून साधिजेल अशीं भविष्यकाळचीं रूपें सिद्ध केलीं जात. देइजे, कीजे, न वचिजे यांत आज्ञार्थ; तर आभावा, सांडावा, करावें, सेवावें, यांत शक्यार्थ स्फुट होई. वाचिजे, आडलिजे, घवडिजे, राहाटिजे, जाइजति बोलौनि, अशीं कर्मणिरूपें तर ज्ञानेश्वरींत असंख्य असून, कृदंतांत मिरवत, कीजत, करितु, पांतु, हीं वर्तमानकालवाचकें; पवासिला, सिक्ष्याविला, उठावले, मीनलें, आस्फुरिला, हीं भूतकालवाचकें; ढवललें, गवसलें, हीं भूतभूतकालवाचकें, व बोलौनि, म्हणोनु, हारपौनि, अशी पूर्वकालवाचकें पुष्कळच सांपडतात. हेत्वर्थक रूपांत सांडूं पांत, हों पांत, अशीं तर कित्येक आहेत.

आतां ज्ञानेश्वरींतील कांहीं सामासिक शब्द पाहिल्यावर, ते सकृद्दर्शनीं तरी कानाला कसेसेच लागतात. मोकळवांदी, अपडती मात, जूझती कुळकेणी

भलतैसा, दारुयंत्र, कलाविद्पण, तुरबंबालु, प्रथमवयसाकाळीं, हे समास पुष्कळसे संस्कृत धर्तीवर असून, कित्येकांत एक संस्कृत व एक प्राकृत अशा दोन भिन्न भाषिक शब्दांचा संयोग केलेला आहे. **निश्चयात्मक** अव्ययांत ‘ कीर ’ ‘ हन ’ व **क्रियाविशेषणांत**, पुडुतीं पुडुतीं, झणें, नावेक, निकें, कीरु, सैंघ, हीं उल्लेखनीय आहेत.

**वाक्प्रचार व सांप्रदाय** यासंबंधानें एवढें खास म्हणतां येईल कीं, देशांतील चालीरीतींत, आचारविचारांत, संस्कृतींत, जसजसा फरक पडत जातो, तसतसे वाक्प्रचारही बदलत जातात. निरनिराळे वाक्प्रचार रूढ होणें, हें भिन्न भिन्न संस्कृतीच्या संगमावर अवलंबून आहे. ज्ञानेश्वरांचा काल स्वराज्याचाच काय, पण परकीय आक्रमणाचा वारा देखील न लागलेला असा असल्यामुळें, तत्कालीं भाषेचें किंवा वाक्प्रचारांचें स्वरूप निर्मळ मराठी असल्यास त्यांत नवल नाहीं. ( १ ) पाटा फुटणें ( २३ ); २ वास पाहणें ( २३ ); ( ३ ) पदा येणें ( ५२ ), ( ४ ) सरतें करणें ( ८० ), ( ५ ) केर फिटणें ( १३२ ), ( ६ ) पाठिशीं घालणें ( १४३ ), ( ७ ) ते घेणें ( १७९ ), ( ८ ) रथ पेलणें ( १७४ ), ( ९ ) आंकणा घालणें ( २०० ), अंग ने घेणं ( १३२ ), ( १० ) हियें घालणें ( १६३ ); ( ११ ) प्राणें उत्तीर्ण होणें ( २०२ ); ( १२ ); मनांत धरणें ( २२७ ); ( १३ ) वसैठा होणें ( २२८ ); ( १४ ) हियें फुटणें ( २३४ ); ( १५ ) आंगीं वाजणें ( २४१ ); ( १६ ) मोकळवांदी होणें ( १५७ ); अशा वाक्प्रचारांत यादवकालीन जीवनाचा ठसा उमटलेला आहे. मात्र ‘ नभरत अश्रुपात ’ यांत भूतभूतकालवाचकाचा नामाप्रमाणें केलेला उपयोग ( नपूंसके भावे क्तः ); समुद्रावगाहनीं, प्रमेयमहानिधि, वस्तुसामर्थ्यशक्ति, अनकलित, अभिमानमदें, महासिद्धीसंभ्रमें, अशीं संस्कृत शब्दांची जागजागीं केलेली योजना; व ‘ जेणें तारिलों संसारपूरु ’ ( येन संसारपूरं तारितः ), ‘ हे वरि भलते करितु ’ ( एते तावत् मनाक् कुर्वंतु ); ‘ का सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलिया परी

विस्तारलें'। ( यथा सुक्षेत्रे पातितं बीजं सहजं विस्तृतं भवति ); व 'प्रतिव्रतेचें हृदय जैसें पतीवांचूनि न स्पर्शे' ( यथा पतिव्रताचित्तं पत्युरन्यं न स्पर्शति ); इत्यादि प्रकारांवरून, शब्दांच्या व वाक्यरचनेच्या बाबतींत मराठीनें अजून संस्कृत भाषेचें जोखड झुगारून दिलें नव्हतें, असेंच दिसून येतें.

## ज्ञानेश्वरकालीन समाज

ज्ञानेश्वरींतील उपरिनिर्दिष्ट भाषासांप्रदायांवरून व ठिकठिकाणीं योजलेल्या अनेक उपमादृष्टांतांवरून तत्कालीन राजकीय, सामाजिक व आर्थिक परिस्थितीचें कांहींसें आकलन होतें. यादवांची राजधानी देवगिरी हा डोंगरी किल्लाच असल्यानें, ज्ञानेश्वरांनीं पांडवांच्या व्यूहांना दिलेली गिरीदुर्गाची उपमा (९४), वरील देवगिरिलाच कदाचित् अनुलक्षून असावी. तसाच रणवाद्यांचा उल्लेख करतांना देखील, ज्ञानेश्वरांनीं मूळ गीतेंत न दिलेल्या भेरी, निशाण, मांदळ, टिविला व भोंगळ, अशा कांहीं रणवाद्यांची यादी दिली असल्यानें, हीं रणवाद्येंही कदाचित् यादवांच्या युद्धप्रसंगीं रूढ असलेलींच वाद्यें (१३३) असणें शक्य आहे. गहिंवरलेल्या व उद्वेगलेल्या अर्जुनानें रथाखालीं उडी टाकल्याचें वर्णन करतांना, त्याला ज्याअर्थी पदच्युत राजकुमाराची उपमा (२६८) देण्यांत आली आहे, त्याअर्थी यादवघराण्यांतील राज्यावरून दूर केलेल्या अशा एकाद्या राजालाच हें अनुलक्षून असावें अशी कल्पना होते. पुनः शहरांत राहणाऱ्या लोकांना नागर म्हणजे सभ्य हें विशेषण लावलें जात असलें ( ४१ ), तरी समाजांत वावरणाऱ्या निरनिराळ्या धंदेवाईक लोकांत कळसूत्री बाहुल्यांचे खेळ दाखविणारे सूत्रधार ( ८१ ) असावे, हें ज्ञानेश्वरांनीं स्वतःलाच लावून घेतलेल्या सूत्रकाराधीन दारुयंत्राच्या उपमेनें सिद्ध होतें. शिवाय मंत्रोच्चारांत प्रमाद झाला कीं, मांत्रिकांतच उलट भूतसंचार होतो (१९०), असा तत्कालीं बसा

समज होता, तद्वतच पायाळूनें डोळ्यांत विशिष्ट प्रकारचें अंजन घातलें असतां, त्याला भूमिगत द्रव्य पुरलेलें ठिकाण दिसतें ( २३ ), अशी भोळी भावनाही तत्कालीं प्रचलित होती. शेषकूर्मांनीं पृथ्वीचा भार सांवरला आहे ( १५४ ) व समुद्राच्या पोटांत वडवानळ आहे (९०), अशा विश्वरचनेच्या पौराणिक, अतिशयोक्त व अद्‌भुत कल्पनावर सर्वसाधारण जनतेचा विश्वास असून, चव्हाट्यावर टाकलेल्या काकबळीच्या उल्लेखावरून ( २५० ) तर, तत्कालीन उच्चवर्णीय समाज कसा स्नानसंध्यावैश्वदेवादि नित्यकर्मांत गढलेला असे हेंच समजण्यासारखें आहे. याही पेक्षां 'व्यासोच्छिष्टं जगत्रयं' किंवा 'भारतांत नाहीं तें त्रिलोकांत नाहीं' ( ४७ ), अशा परंपरागत चालत आलेल्या आप्तवाक्यावर विसंबून राहणारे लोक जसे त्या कालीं होते, तसेच समुद्रांत स्नान केल्यानें त्रिभुवनांतील सर्व तीर्थांत स्नान केल्याचें श्रेय मिळतें ( २६ ), असे डोळे झांकून समजून चालणारे हरीचे लालही यादवकालीन समाजांत वावरत होते.

तथापि कौटुंबिक संबंधाच्या बाबतींत ज्ञानेश्वरांनीं एकंदरीनें पातिव्रत्याचा गौरवच केला आहे असें आढळून येतें. कारण पतिव्रता पतीशिवाय परपुरुषाचा विचार मनांतहि आणीत नसत ( १११ ), इतकेंच काय पण तरुणपणाच्या भरांत एखादा गृहस्थ कामुकपणानें आपल्या धर्मपत्नीची उपेक्षा करून जर दुसऱ्या स्त्रीच्या पाशांत सांपडला (१८७), तर त्याची कुलीन व लावण्यवती धर्मपत्नी, आपल्या गुणांचा झालेला अपमान सहन न करण्याइतकी तेजस्विनी असे, हें ज्ञानेश्वरांनीं अर्जुनाच्या वीरवृत्तीला दिलेल्या दृष्टांतावरून चांगलेंच ध्वनित होतें. पण अशा कांहीं संदर्भावरून ज्ञानेश्वरकालीन समाजाची ओझरती ओळख जशी आपणास होते, तसेंच धागऱ्या, मेखला, नुपुरें इत्यादि सुवर्णालंकारांचे; कोंदणांत बसविलेल्या रत्नखचित मणिभूषणाचे; (५-९), रंगविलेल्या वस्त्रांचे ( ६ ); व सुपीक जमिनींत पडलेल्या

बीजाचें (४०), असे जे उल्लेख ज्ञानेश्वरींत आले आहेत, त्यावरून तत्कालीन सांपत्तिक स्थितीचें चित्र पुसट कां होईना, पण आमच्या डोळ्यापुढें उभें राहतें.

एकंदरीनें यादवकालीन लोक कृषिप्रधान, संपन्न, व आत्मसंतुष्ट असून, सश्रद्ध, भाविक, परंपरागत रूढीवर व आप्तवाक्यावर विश्वास ठेवणारे होते असेंच म्हणतां येईल. केळींत उत्पन्न झालेला कापूर त्याच्या परिमळानें कळतो ( १८३ ), किंवा टिटवीनें आपल्या चोंचीनें सागरांत भर घालणें हास्यास्पद आहे ( ६८ ), अथवा सूर्यापुढें काजव्याला शोभा कशी येणार ? ( ६७ ), अशा रूढ वाक्प्रचारांवरून जशी त्यांची बहुश्रुतता व विचक्षणता दिसून येते, तशीच पातिव्रत्याबद्दल व एकपत्नीव्रताबद्दल त्यांना वाटणाऱ्या आदरावरून व व्यभिचाराबद्दल त्यांना वाटणाऱ्या घृणेवरून, त्यांच्या शुद्ध चारित्र्यविषयक कल्पनांचें आकलन होतें. भगवद्गीता हा ग्रंथ प्राकृतजनाना सुगम व्हावा, यासाठीं जनबोलींतील शब्दांचा, लोकप्रचारांतील म्हणींचा, बहुजनसमाजांतील आचारपद्धतींचा व समजुतींचा, ज्ञानेश्वरांनीं उपमादृष्टांतांच्या रूपानें भरपूर उपयोग करून घेतल्यामुळें, त्यांचा ग्रंथ म्हणजे तत्कालीन समाजस्थितीचा आरसाच म्हणावयास हरकत नाहीं. आपल्या सभोंवतीच्या समाजाचें सहानुभूतिपूर्वक सूक्ष्म निरीक्षण करून लिहिणारा लेखक, स्वकालीन समाजेतिहासाच्या व भाषाशास्त्राच्या दृष्टीनें पुढील पिढ्यांना कसा उपकारक होतो, हें ज्ञानेश्वरमहाराजांच्या उदाहरणावरून कळून येतें. ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांत त्यांच्या व्यक्तित्वाचें व तत्कालीन समाजस्थितीचें पडलेलें प्रतिबिंब, प्रस्तुत पहिल्या अध्यायांतही अंशतः दिसून आल्याशिवाय राहत नाहीं. ज्ञानेश्वरीचा अभ्यास यासाठींच सांप्रदायिक दृष्टीप्रमाणेंच आधुनिक चिकित्सक दृष्टीनेंही होणें अवश्य आहे.

## प्रस्तुत अध्यायाची संपादणी

प्रस्तुत प्रत तयार करतांना कै. रामचंद्र विष्णु माडगांवकर, कै. इतिहासाचार्य राजवाडे, ब्रह्मीभूत नानामहाराज साखरे, व डॉ. हर्षे यांनीं

अलीकडेच संपादित केलेली पहिल्या अध्यायची सिद्धनाथप्रत, अशा ज्ञानेश्वरीच्या चार प्रतींचा उपयोग केला असून, मूळ संहिता यादवकालीन भाषेचा पडताळा पाहूनच निश्चित करण्याचें धोरण स्वीकारल्यामुळें, मुख्यतः त्या भागेला जवळची अशी राजवाडेप्रतच महानुभावी वाङ्मयाच्या तुलनेनें पारखून घेतली आहे. ज्ञानेश्वरींत येणारे विशिष्ट शब्द, वाक्प्रचार व वाक्यरचना या महानुभावी वाङ्मयांत अगदीं तशाच स्वरूपांत आढळल्यानें, मूळ ज्ञानेश्वरींत त्या तशाच आल्या असल्या पाहिजेत असा तर्क करतां येऊन, आजच्या अनेक अपपाठांच्या बुजबुजाटांतून शुद्ध पाठांची निश्चिति करतां आली आहे. आज ज्ञानेश्वरी व महानुभावी वाङ्मय या दोहोंत अगदीं सर्वसाधारण येणारे असे, सपुर, वसैठा, गरुवती, सूणे, सांदुकणें, उपवणें, हियें, सुरवाडलें, जगजेठी, पाडु, वरिचिल, दादुले, हीन, जावळिजे, कांतला, ब्रह्मकटाह, गमबजणें, जवळीके, कांठाला, घरणें, इत्यादि शब्द जसे आपणास सहजासहजीं आढळतात, तसेच पाटा फुटणें (ओ. २३); वास पाहणें (२३); सरतें करणें (८०); आंकणा घालणें (२००) इत्यादि वाक्संप्रदायही तेथें घर करून बसलेले दिसतात. त्यामुळें रा. माडगांवकर किंवा साखरे यांच्या प्रतींतील पाठांचें तर राहोंच, पण वरील सामग्रीच्या तुलनेनें, डॉ हर्षे यांनीं विशेष अभिनिवेशानें प्राचीनतम म्हणून ठरविलेल्या त्यांच्या सिद्धनाथप्रतींतील कांहीं महत्वाचे पाठही, अगदी अर्वाचीन म्हणून अग्राह्य ठरवावे लागले आहेत. उदाहरणार्थ, ओवी २३ मध्यें, डॉ हर्ष्यांनी 'पहाट फुटणें' असा पाठ स्वीकारला आहे, व तोच बरोबर असल्याचा निर्वाळाही दिला आहे. पण 'पाटा फुटणें' ही म्हण यादवकालीं 'दिसणें' या अर्थी रूढ होती, हें महानुभावीवाङ्मयावरून कळून आल्यानंतर, हर्ष्यांचा वरील पाठ इतर प्रतींतील पाठाप्रमाणेंच अलीकडचा आहे, हें सांगण्याची जरूरी राहत नाहीं. असाच प्रकार 'वसैठ' ( ३० ); 'वरिचिल' ( ११९ ); 'कांतला' ( १३८ ); अशा बऱ्याच पाठभेदांत झाला असल्यानें, व त्याबद्दलचें

स्पष्टीकरण पुढें टीपांत केलें असल्यानें, येथें त्यांबद्दल अधिक प्रपंच मांडून जागा आडवीत नाहीं. तथापि ओवी २०० मधील 'निवातकवचाचा ठावो फोडिला' हा डॉ. हर्षांचा एकच पाठ थोडासा बारकाईनें पाहिल्यास, त्यांच्या प्रतींचें अर्वाचीनत्व ठरविण्यास हस्तलिखित पोथींतील विशिष्ट शकाचा वादही घुसळत बसण्याचें कारण नाहीं, हें उमगून येईल. कारण वरील पाठाबद्दल, 'कृतांतु आंकणा घातला' हा राजवाड्यांचा पाठ, महानुभाव वाङ्मयांत अगदी तोच वाक्प्रचार रूढ होता म्हणून जसा ग्राह्य ठरला आहे, तसाच वरील 'निवातकवचाचा' उल्लेख पुढें दुसऱ्या अध्यायाच्या दहाव्या ओवींत पुनः आला असल्यानें, ज्ञानेश्वर एकच पौराणिक संदर्भ दोन ठिकाणीं वापरणार नाहींत, या सरळ व काव्यात्मक समजुतीवरही तो स्वीकरणीय ठरला आहे. सारांश प्रस्तुत प्रत तयार करतांना, निवळ राजवाडेप्रतीचा तर्जुमा केला नसून, भिन्न भिन्न पाठांची छाननी, महानुभावीय वाङ्मयाच्या व तत्कालीन भाषेच्या अनुषंगानें करूनच, डोळसपणानें येथे या अध्यायाची संहिता ठरविण्यांत आली आहे. उपरिनिर्दिष्ट चारी प्रतींपैकीं स्वीकारलेला पाठ वर ठळक अक्षरांत देऊन बाकीचे तळटीपांत दिले असून, स्वीकारलेल्या पाठांचें समर्थन त्या त्या स्थळीं टीपांत केलें आहे.

राजवाडेप्रतीप्रमाणेंच प्रस्तुत पहिल्या अध्यायाची ओवीसंख्या २७३ आहे. मांडगांवकर, साखरे व सिद्धनाथप्रतींत, २४१ ओवीनंतर एक, व २६५ नंतर एक, अशा दोन ओव्या अधिक आल्यामुळें, त्यांच्या एकंदर ओव्यांची संख्या २७५ होते. पण या दोन्हीं ओव्या त्यांच्या मागील त्या त्या ओव्या पाहतां, पुनरुक्ति करणाऱ्या अतएव प्रक्षिप्तच मानाव्या लागतात. सदर दोनी ओव्या, पृ. ४० व ४५ वर तळटीपांत दिल्या आहेत.

वरील स्पष्टीकरणावरून ज्ञानेश्वरीसंहितेच्या पाठनिश्चितीचा, महानुभाव वाङ्मयाच्या कसोटीनें थोडा अभिनव उपक्रम येथे केल्याचें आद-

रून येईल. टीपांत मूळ ओंव्यांचें अर्थ देतांना, सर्वसाधारणपणें ज्ञानेश्वरांचा आशय स्पष्ट केला असून, शक्यतों सरळ व बुद्धिगम्य विवरण करण्याचा प्रयत्न केला आहे. आपलें व्याख्यान करतांना श्रीमद्भगवद्गीतेच्या श्लोकांच्या अर्थाला ज्ञानेश्वरांनीं कोठें व कशी मुरड घालून ग्रंथविस्तार केला आहे, तें दर्शवून, गीता व ज्ञानेश्वरी यांच्या तौलनिक अभ्यासाचीही नवी दिशा येथें मांडली आहे. प्रस्तुत प्रतींतही मी संपादिलेल्या ज्ञानेश्वरीच्या १२ व १६ अध्यायांप्रमाणेंच पहिल्या अध्यायाच्या बहुविध व सांगोपांग अभ्यासाची रूपरेखा दाखविली असल्यामुळें, तो विद्यार्थ्यांना व सामान्य अभ्यासकांना उद्बोधक व मार्गदर्शक होईल अशी आशा आहे.

कोल्हापूर
५।७।५१.

दत्तात्रय सीताराम पंगु



## या आवृत्तींतील पाठभेदांत आलेलीं सांकेतिक अक्षरें.

रा.—राजवाडेप्रत.

मा.—माडगांवकरप्रत.

सा.—साखरेप्रत.

सिद्ध—सिद्धनाथप्रत ( हर्षे संपादित ).

### ज्ञानेश्वरीच्या भाषेस लागूं पडणारे भाषाशास्त्राचे

### सामान्य नियम

(१) यकारांत व हकारांत विरहित, अकारांत नामें अथवा विशेषणें उकारांत होतात. उदा. प्रष्णु, आधारु, अवकाशु,

(२) ष किंवा क्ष च्या ऐवजीं ख येतें. उदा. उन्मेख, पोखलें.

(३) ऋ चा अ, इ किंवा उ होतो. उदा. हियें, उजु, दिठी.

(४) शब्दांच्या आरंभीं ट नसतां, त्याचें ड होत. उदा. आडदरु. तसेंच क चें ग, व ध चें झ होतें. उदा. मुगुति ( मुक्ति ), माजि ( मध्य ).

(५) जोडाक्षराकरतां साधें अक्षर येतें व असें होतांना जोडाक्षरामागील वर्ण दीर्घ होतो. उदा. साचे ( सत्य), आगि ( अग्नि ).

(६) ज्या दोन व्यंजनांचें जोडाक्षर होतें, त्यांपैकीं एकांत किंवा दोन्हींत मध्येंच स्वर येऊन मिळतो. उदा. वरिषताति, कवतिक.

(७) कित्येक शब्दांतील पहिला, मधला किंवा शेवटचा वर्ण लुप्त होतो. उदा. पांता ( पाहतां ), विर्शी ( विपर्यी ).

(८) कांहीं शब्दांच्या पहिल्या, मधल्या किंवा शेवटच्या अक्षरांत ह येऊन मिळतो, अगर त्याबद्दल ह येतो. उदा. सांधिजैल, ( सांगिजैल ), गहिर ( गभीर) वेन्हि ( वरि ).

( ९ ) ज्या शद्बांच्या शेवटीं ' अय ' असेल, त्याबद्दल ओ होतो. उदा. वि॰ ( विस्मय ).

( १० ) कांहीं शद्बांत म च्या जागीं व आलेलें असतें. उदा. कोवाळिये ( कोमल ), तर कित्येकांत य बद्दल व येतें. उदा. मावा ( माया ).

—★—

# ज्ञानेश्वरी

## अध्याय पहिला



ॐ नमो[1] आद्या । वेदप्रतिपाद्या । जयं[2] स्वसंवेद्या ।
आत्मरूपा ॥ १ ॥ देवा तूं चि[3] गणेशु । सकलार्थप्रकाशु । ह्मणे
निवृत्तिदासु । अवधारिजो[4] ॥ २ ॥ हें शब्दब्रह्म अशेष । ते चि
मूर्त्ति सुरेखें[5] । जेथ[6] वर्णवपु निर्दोष[7] । मिरवत असे[8] ॥३॥ स्मृति ते
चि अवेवं[9] । रेखा[10] अंगिकभाव[11] । तेथ लावण्याची टेवें[12] । अर्थशोभा
॥ ४ ॥ अष्टादश पुराणें । तियेचि[13] मणिभूषणें । पदपद्धति
खेवणें । प्रमेयरत्नांची[14] ॥ ५ ॥ पद्यबंध[15] नागर । तें चि रंगाथिलें[16]
अंबर । जेथ साहित्य वाणें संपुर[17] । उजलाचें[18] ॥६॥ देखा काव्य-
नाटका[19] । जिं[20] निर्धारिता सकौतुका[21] । तिया[22] चि रुणझुणिति[23]

---

१ नमोजी—मा, सा. २ जय जय—सा. ३ तुं चि–सिद्ध. ४ अवधारिजो जी—मा, सा. ५ सुरेष–सिद्ध; सुवेष—मा, सा. ६ जेथें–राज. ७ निर्दोष–मा, सा. ८ मिरवतसे–सिद्ध. ९ अवयव–राज, सा. १० देखा—सा, मा. ११ अंगीकभाव—सिद्ध, मा, सा. १२ ठेव—मा, सा. १३ तें चि—मा; तीं चि—सा. १४ प्रमेयरत्नांची—मा, सा. १५ पदबंध–सिद्ध; मा, सा. १६ अंगाथिलें–सिद्ध. १७ सपूर—सिद्ध, सा, मा. १८ उजालाचें—सिद्ध; उजाळाचें—मा, सा. १९ काव्यनाटक—सिद्ध. २० जे —मा, सिद्ध, सा. २१ सकौतुक—सिद्ध. २२ तिया—सिद्ध; त्याचि—मा, सा. २३ रुणझुणितियां—सिद्ध.

क्षुद्रघंटिका । अर्थध्वनि[1] ॥७॥ नाना प्रमेयाची परि । निपुणपणें पातां[2] कुसरि । दीसती उचित पदे माझारि । रत्नें भलीं ॥८॥ तेथ[3] व्यासादिकांचिया मती । चोखडेपणें झलकती । तिया मेखले मिरवती । पल्लवपडका ॥९॥ देखां षड्दर्शनें म्हणिपति[4] । ते चि भुजांची आकृति । म्हणौनि[5] विसंवादें धरिति । आयुधातें ॥१०॥ तरि तर्कु तोचि परशु[6] । नीतिभेदु अंकुशु । वेदांतु[7] महारसु । मोदकु मिरवे ॥११॥ एकीं[8] हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु । तो बौधमतसंकेतु[9] । वार्तिकांचा ॥१२॥ मग सहाजें[10] सत्तर्कवादु[11] । तो पद्मकरु[12] वरदु । धर्मप्रतिष्ठा तो सिध्दु । अभयहस्तु ॥१३॥ देखां विवेकु[13] तंव विमलु[14] । तो चि शुंडादंडु सरलु । जेथ परमानंदु केवलु । महासुखाचा ॥१४॥ तरि संवादु तो चि दशनु । समता[15] शुभ्रवर्णु । देऊ उन्मेखसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ॥१५॥ मज अवगमलिया दोन्हीं । मीमांसा श्रवणस्थानीं । बोधमदामृत मुनी- । अलि सेविती ॥१६॥ प्रमेयप्रवालसुप्रभ । द्वैताद्वैत[16] निकुंभ । सरिसे एकवटति[17] इभ- । मस्तकावरी ॥१७॥ उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें ।

---

१ अर्थध्वनीं-सिद्ध. २ पाहतां-सिद्ध, मा, सा. ३ जेथ व्यासांदिकाची मति । ते चि मेखळा मिरवती । चोखाळपणें झळकती । पल्लवसडका-मा, सा. ४ म्हणिजति-सिद्ध. ५ म्हणूनि-राज. ६ फरशु मा, सा. ७ वेदांत तो-मा, सा. ८ एकु-मा, सा; एकु—सिद्ध. ९ बौद्धमतसंकेतु-मा, सा. १० सहजे-सिद्ध, सा, मा. ११ सत्कारवादु-मा, सा; सतर्क सतकारवादु—सिद्ध. १२ पद्मकर—सिद्ध. १३ विवेकवंतु-राज; विवेकवंत-सिद्ध. १४ सुविमळु-सा, मा. १५ जो समताशुभ्रवर्णु-सिद्ध, रा, सा. १६ द्वैताद्वैत तेचि निकुंभ-सिद्ध, सा, मा. १७ एकदटत-सिद्ध.

हे नेणसि तूं कवण । तरि[1] पैल पैं[2] भीष्मद्रोण । जेयांचे[3] उपकार असाधारण । आम्हां बहुत ॥ २२२ ॥ एथें[4] शालेक[5] ससुरे[6] मातुल । आणि बंधु किरं[7] हे सकळ । पुत्र नातू केवल । इष्ट[8] असति ॥ २२३ ॥ अवधारीं अति ज्वेलिकेचे[9] । हे सकल ही सोइरे आमुंचे[10] । ह्मणौनि दोषु आंथि[11] वाचे । एणों[12] नावें ॥ २२४ ॥

एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोपि मधुसूदन ।

अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥

हे वैर[13] भलेतें[14] करितु । आतां चि एथ[15] मारितु[16] । परि आपण मनें घातु । न चिंतावा ॥ २२५ ॥ त्रैलोकिचें अनकैलित[17] । जैन्हें[18] राज्य जोडैलें[19] एथ । तेंन्हें[20] हें अनुचित । नाचरें मीं ॥ २२६ ॥

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।

पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

---

१ परि-सा, २ हें अक्षर सिद्ध, सा. मा. प्रतींत नाहीं. ३ जयांचे--सिद्ध, सा, मा. ४ यथ--सिद्ध. ५ साळक--मा. ६ सासुरे--सिद्ध, मा; सासरे--सा. ७ कीं-- सा. हा शब्द सिद्धनाथप्रतींत नाहीं. ८ इष्टही-- सिद्ध; सा, मा. ९ जवळिकेचे--सा, मा. १० आमचे-राज. ११ आथी--सिद्ध; आर्थी--सा. १२ बोलतांचि-सिद्ध; मा, सा. १३ वरि--सा; वरी--मा. १४ भलतें--मा; भलें तें--सिद्ध. १५ एथें-सिद्ध, येथें--सा. १६ मारूतु--सिद्ध. १७ अनकळित-सा. १८ जन्हीं--सिद्ध; जरी--मा, सा. १९ होईल--सिद्ध, सा. २० तन्ही--सिद्ध; तरी--सा, मा.

जरि[1] आजि एथ ऐसें कीजे । तरि कवणोचां[2] मनीं[3] उरिजे । सांघै[4] सुख केवि पाहिजे । तूझें[5] कृष्णा ॥ २२७ ॥ जरि वधु करुनुं[6] गोत्राचां[7] । तरि वसैठा[8] होइन[9] दोखांचा[10] । मग[11] जोडिलासि[12] तूं हातिचां[13] ! दूरि[14] होसि ॥ २२८ ॥ कुलहरणी[15] पातकें । तियें आंगीं जडति अशेखें[16] । तें व्हलि[17] तूं कवणें कें । देखावासि ॥ २२९ ॥ जैसा उद्यानामाझि[18] अनलु । संचरला देखौनि[19] प्रचलु । क्षणु एकु[20] कोकिलु । स्थिरु[21] न्हवे[22] ॥ २३० ॥ कां सकर्दमु[23] सरोवरू[24] । अवलोकुनिया[25] चकोरु । न सेवेतु[26] अव्हेरु । करुनि निगे[27] ॥ २३१ ॥ तिया परीं तूं देवा । मग झांकउं[28] नैयेसि[28] मावा । जरि पुण्याचा ओलावा[29] । नाशि-जैल ॥ २३२ ॥

१ जरी--सा, मा. २ कवणांचा--मा; कवणाच्या--सा. ३ मानी--सिद्ध. ४ सांगे-सिद्ध, सा; सांगै--मा. ५ तुझें--सा. मा, सिद्ध. ६ करूनि--सिद्ध; करी--मा, सा. ७ गोत्रजांचा--सा. ८ वसौटा- सा, मा, सिद्ध. ९ होऊनि--मा, सा; होउनि-सिद्ध. १० दोषांचा--सा, सिद्ध, मा. ११ मज--मा, सिद्ध, सा. १२ जोडला-सिद्ध. १३ हातींचा--मा, सा; हातिचा--सिद्ध. १४ दूरी मा, सा. १५ कुलह-रणीं--सिद्ध. १६ अशेषें--राज, सिद्ध. १७ ते व्हेली--सिद्ध; तये वेळीं--सा. मा. १८ उद्यानामाजि--मा, सिद्ध; उद्यानामाजीं--सा. १९ देखोनि--सा, सिद्ध, मा. २० मग क्षणुभरी--मा; मग क्षणभरि--सिद्ध; मग क्षणभरीं--सा. २१ स्थिर--राज, सा, सिद्ध. २२ नव्हे--सिद्ध मा; नोहे--सा. २३ सकर्दम--सा, मा. २४ सरोवर--सा, मा. २५ अवलोकुनि--सिद्ध; अवलोकुनी--मा, सा. २६ सेवित--मा, सा. २७ निघे--सा, सिद्ध. २८ झांकउं न येसी--सिद्ध; झकौं नयेसि--मा; झकउन न येसी--सा. २९ वोलावा--सिद्ध; सा, मा.

तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्सबांधवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

[1]म्हणौनि मीं हें न करीं । इये संग्रामीं शस्त्र न धरीं । हें कीडाले[2] वहुतीं[3] पैं[3] । दीसतसे[4] ॥ २३३ ॥ तुजासि[5] अंतराऊ[6] होइल । मग सांघे[7] आमुचें[8] कांइ[9] उरैल । तेणें दुःखें चि[10] हियें फुटैल । तुंआंविण[11] ॥ २३४ ॥ म्हणौनि[12] कौरव हे वधिजति । मग आम्हीं भोग भोगिजति । हे असो[13] मातु[13] अघडती । अर्जुनु[14] म्हणे ॥ २३५ ॥

यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥

हे अभिमानमदें भुलले[15] । जन्हीं[16] या संग्रामा[17] आले । तन्हीं[18] आम्हीं[19] हितं[20] आपुलें । जाणावें लागे ॥ २३६ ॥ मागें[21] चि[21] चालतां । पुढां सिंहु दीसे[22] अवचिता । [23]तो चूके तवंरि चुकवितां । वांचिजे[24] कीं ॥ २३७ ॥

---

१ म्हणोन--सा. २ किडाळ--रा, मा; किडाल--सिद्ध. ३ बहुते परी--सिद्ध. ४ दिसत असे--सिध्द; दिसतसे--मा, सा. ५ तुजसीं--सा, सिद्ध, मा. ६ अंतरावो--सिद्ध, मा; अंतराय--सा. ७ सांगें--सिध्द, सा; सांगै--मा. ८ आमचें--राज. ९ काय--सिद्ध, सा, मा. १० हा शब्द माड. सा. व सिद्ध. प्रतींत नाहीं. ११ तुजविण कृष्णा--सिद्ध; तुजवीण कृष्णा--सा, मा. १२ म्हणउनि--सा. १३ मातु अगो--सिद्ध. १४ अर्जुन--सिद्ध, सा, मा. १५ भुरले--सिद्ध, सा, मा. १६ जरी--सा. १७ संग्रामां--मा; सा. १८ तरी--सा. १९ आम्हां सा. २० हीत--सिद्ध. २१ हां जी मार्गीं--सिध्द, हां जो मार्गी--मा; हां जी मार्गे--सा. २२ जाला--सिध्द, मा, जाहला --सा. २३ तो तंव चुकविता--सिध्द, मा. सा. २४ लाभु आथी--सिध्द, सा; लाभ आथि--मा.

कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्त्तितुं ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

हें ऐसें कैसें करावें । जें[1] आपुले आपण मारावे । जाणतां[2] केवि सेवावें । कालकूट[3] ॥२३८॥ आता[4] असता प्रकाशु[5] सांडावा । मग अंधकूपु[6] आश्रावा । तरि तेथें[7] कवणु[8] देवा । लाभु[9] सांघे[10] ॥ २३९ ॥ कां समोर आगि[11] देखौनि[12] । जरि न वाचिजे चि[13] ओसंडुनि[14] । तरि क्षणा एका कवलुनि[15] । जालूं सके[16] ॥२४०॥ तैसे दोखें[17] हे मूर्त । आंगीं वाजों असति पातें[18] । हें जाणतां[19] केवि एथ । प्रवर्त्तावें ॥ २४१ ॥*

कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

---

१ हा शद्ब सिद्ध--प्रतींत नाहीं. २ जागत जाणतां चि--मा; सिद्ध, सा. ३ काळकूट--सा, मा ४ हा शद्ब सा, मा, व सिद्ध. प्रतींत नाहीं. ५ प्रकाश-- सा, मा, सिध्द. ६ अंधकूप--सा, मा, सिध्द. ७ तेथ--सिध्द, सा, मा. ८ कवण--सिध्द, सा, मा. ९ लाभ--मा. १० सांगे-सा; सांगे--सिध्द, मा. ११ अग्नि-सा; आगी--मा. १२ देखोनि--सिध्द; देखोनी--सा; देखौनी--मा. १३ हा शब्द सा, मा, व सिध्द--प्रतींत नाहीं. १४ वोसंडौनि--सिध्द; वोसंडोनी-सा; वोगंडौनी-मा. १५ कवळूनि--सिध्द; कवळुनी- सा. मा. १६ शके--राज, सिध्द. १७ दोष-सिध्द, सा, मा. १८ पाहात-सिध्द, मा, सा. १९ जागताहीं--सिध्द; जाणतांही-सा, मा. * या २४१ ओवीनंतर 'ऐसें पार्थु तिये अवसरीं । ह्मणे देवा अवधारीं । यया कल्मषाची थोरी । सांगेन तुज ॥ २४२ ॥" ही ओवी सिध्द, साखरे, व माड. प्रतींत अधिक दिली आहे.

जैसें काष्टें काष्ट मथिजे । तेथ वन्हि एकु उपजे । तेणें काष्टजात जालिजे । प्रज्वललेंनि ॥ २४२ ॥ तैसें[1] गोत्रिं[2] चि परस्परें । जरि वधु घडे मत्सरें । तरि तेणें दोषें [4]महाघोरें । कुल चि नंशे[5] ॥ २४३ ॥ ह्मणौनि एणें[7] पापें । वंशजधर्म लोपे । मग [6]अधर्मु[8] चि आरोपे । कुलामाजि ॥ २४४ ॥

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥

तेथ[10] सारासार न विचारावें । कव्हणें[9] काइ आचरावें । जेंणें विधिनिषेध आघवे । पारुंखति[11] ॥ २४५ ॥ * असता दीपु [12]धवंडिजे । मग अंधकारि राहाटिजे । तरि उजू चि [13]आडं-लिजे । जेयां[14] परी ॥ २४६ ॥ तैसा कुलीं [15]क्षयो होये । ते[16]व्हांलिं [17]आदिधर्मु जाए । मग आन कांहीं आहे । पा[18]पावांचौनि

---

१ तैसा—सिद्ध, सा, मा. २ गोत्रींच--सिद्ध. ३ महादोषें–सिद्ध, मा, सा. ४ घोरें--सिद्ध, सा, मा. ५ नाशे--सिद्ध, सा. मा. ६ अधर्मचि--राज, सा, मा. ७ एथ--सा. ८ हा शब्द सा. मा. व सिद्ध, प्रतींत नाहीं. ९ कवणें--सिद्ध; सा, मा. १० आणि--सिद्ध, सा, मा. ११ पारुपती--सा, मा, सिद्ध. * ही २४६ ओवी सिद्धनाथप्रतींत, ४० श्लोकाखालीं २४३ नंतर दिली आहे. १२ दवडिजे--सा, सिद्ध, मा. १३ आडळिजे–मा; कां अडखळिजे–सा. १४ जियापरी–सिद्ध; जयां-परी--सा; जयांपरी–मा. १५ कुलक्षय –सिद्ध; कुळक्षय--मा, सा. १६ तये वेळीं--सा, मा. १७ तो आद्यधर्मु–मा, सा. १८ पापावांचुनी–मा, सा.

॥ २४७॥ जैं यमनियम टकति[1] । तैं[2] इंद्रियें सैरा विचरति[3] । ह्मणौनि[4] व्यभिचार घडति । कुलस्त्रियां[5] ॥ २४८ ॥ उत्तम[6] अधर्मी संचरति । वर्णावर्ण[7] मिसलति[8] । तेथ समूल[9] उपडति[10] । जातिधर्म ॥ २४९ ॥ जैसें[11] चोहटांचेयां[12] बली । पांवति[13] सैरा काउलीं[14] । तैसीं महापापें कुलिं । प्रविशति[15] ॥२५०॥

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥

मग कुला[16] तेयां[16] अशेखा[17] । आणिकें[18] कुलघातकां[19] । एरएरा[20] नरका । जैणें[21] आथि[22] ॥ २५१ ॥ देखें[23] वंशवृद्धि समस्त । ईया[24] परी होएं[25] पतित । मग उंवंडति[26] स्वर्गस्थ । पूर्वपुरुष ॥ २५२ ॥ जेथें[27] नित्यादि क्रिया टैके[28] । नैमित्तिकें[29] कर्म पारुखे[30] । तेथ कव्हणा

---

१ ठाकती--सिद्ध; मा, सा. २ तेथ--सिद्ध, सा, मा. ३ राहाटती--सा. ४ म्हणऊनि--सा ५ कुलस्त्रियांसि--सिद्ध; कुळस्त्रियांसि--सा. ६ उत्तम म्हणौनि--मा. ७ ऐसे वर्णावर्ण--सिद्ध मा. ८ मिसळती--मा, सा. ९ समूळ--मा, सा. १० उपडती--सिद्ध, मा, सा. ११ जैसी--सिद्ध; सा; जैसीं--[illegible]. १२ चोहट्याचिये--सिद्ध; मा, सा. १३ पावि[illegible] --सा. १४ काउळीं--मा, सा. १५ प्रवेशती--सिद्ध, मा; संचारतो--सा. १६ कुळा तया--सिद्ध. १७ [illegible]पा--सिद्ध. १८ आणि--सिद्ध, मा, सा. १९ तया कुलघात[illegible]--सिद्ध. २० येरयेरां--सा, मा. २१ जेणें--सिद्ध. २२ आथी मा, सा, सिद्ध. २३ देखे--सा. २४ ययापरी--सिद्ध; यापरी--सा, मा. २५ होय--सिद्ध; होय--सा, मा. २६ वोवांडती--सिद्ध, मा; वोवांडिती--सा. २७ जैं जैं--सिद्ध. २८ ठाके सिद्ध; सा. मा. २९ आणि नैमित्तिक--सिद्ध, मा, सा. ३० पारुषे--सिद्ध.

तिळोदकें । कवण अर्पी[1] ॥ २५३ ॥ तरि पितर काइ[2] करिति । कैसेनि स्वर्गिं वसति । म्हणौनि[3] ते ही येति । कुळांपासिं[4] ॥ २५४ ॥ जैसा नखाग्रिं व्याळें[5] लागे । तो शिखांत पावे[6] वेगें । तेविं आब्रह्म कुळ आधवें[7] । आप्लुविजे ॥ २५५ ॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

देवा अवधारीं आणिक एक । एथ घडे महापातक । जें संगदोषें हें[8] लौकिक । भ्रंश[9] पावे ॥ २५६ ॥ जैसा घरिं आपुलां । वांनित्रसें[10] वन्हि[11] आला[12] । तो आगीं[13] हीं प्रज्वळला[14] । जाळोनि घाली[15]

[1] आर्पे—सिद्ध. [2] काय-सिद्ध, रा. [3] म्हणोनि—मा. [4] कुळापासीं-सिद्ध; कुळापासों—मा, रा. [5] व्याळें—मा, व्याळु—सा. [6] व्यापी—सा, सिद्ध, मा. [7] अधवें—सिद्ध; अवघें—सा, मा; [8] हा—सा. [9] भ्रंशु-सिद्ध. [10] वानिवानें-सिद्ध; वांनिवशें—मा [11] आग-रा. [12] लागला—सिद्ध. [13] आगिआंतही-सिद्ध. [14] प्रजळला-सिद्ध; प्रज्वळिला—सा, मा. [15] जाळुनि घाली—सिद्ध; जाळूनि घाली—स, मा.

॥ २५७ ॥ तैसिया[1] तिया कुलसंगती[2] । जे जे लोक प्रवर्त्तति[3] । ते[4] हिं बाधा[5] पावति । निमित्तें एणें[6] ॥२५८॥ तैसें नाना दोषीं[7] संकुल[8] । अर्जुनु[9] ह्मणे[10] तें कुल । महाघोर[11] केवल । निरय भोगी ॥ २५९ ॥ पडिलेयां[12] तिये ठाइं । कल्पांतीं[13] हीं उगंडु[14] नाहिं । एसणें पतन कुलक्षयिं । अर्जुन ह्मणे ॥ २६० ॥ देवा हें विविध आइकिजे[15] । परि अझुइंवरि[16] त्रास नुपजे । हियें[17] वज्राचें हें काइ कीजे । अवधारीं पां ॥२६१॥ अपेक्षिजे राज्यसुख । जेयां-लागिं[18] तें तंवं[19] क्षणिक । ऐसें जाणतां हीं दोषु[20] । अव्हेरुं[21] ना ॥२६२॥ जें हे वडिल सकल[22] आपुले । वधावेया[23] दीठि[24] सूदले[25] । सांघै[26] पां काइ[27] थेकुलें । घडलें आह्मां ॥ २६३ ॥

---

१ तेसी या-सिद्ध. २ कुलसंमती-सिद्ध. ३ वर्तती-सिद्ध, मा, सा. ४ तेही-सिद्ध, मा, सा. ५ बाधु-सिद्ध, मा. ६ येणें-सा, मा. ७ दोष-सिद्ध; दोषें-सा, मा. ८ सकल-सिद्ध ; सकळ—मा, सा. ९ आर्जून-सिद्ध. १० हे दोनी शब्द सिद्ध. प्रतींत नाहींत. ११ मग महाघोर-मा, सा, सिद्ध. १२ पडि-लयां-सिद्ध. मा; पडिलिया-सा. १३ मग कल्पांतीही—सा, मा, सिद्ध. १४ उकलु-सिद्ध, सा. १५ आयिकिजे--सिद्ध; कानीं ऐकिजे--सा, मा. १६ अ-झणूंवरि--सिद्ध; अझुणिवरि--मा; अझुनिवरी--सा. १७ हृदय--मा, सिद्ध. १८ जया लागि--सिद्ध; जयालागीं--मा; सा. १९ देह-सिद्ध. २० दोष—सिद्ध. २१ अव्हेरू-सा, मा. २२ हा शब्द सिद्ध. प्रतींत नाहीं. २३ वधावया-सिद्ध, सा, मा. २४ दिठी-मा; दिवी-सिद्ध. २५ सुदले-सिद्ध. २६ सांग-सिद्ध. सा, मा. २७ काये—सिद्ध; काय-सा.

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥४६॥

आतां इयावेरि[1]हिं जें जिंआवें[2] । तेयापासौनि[3] हें बरवें । जें शस्त्रें संडौनु[4] साहावे । घाण एयांचे[5] ॥ २६४ ॥ ईयावेरि[6]हि होएं[7] जेतुकें[8] । तें मरण हीं वरें[9] नीकें । परि एणें कल्मषें । चाड नाहीं ॥ २६५ ॥*

सञ्जय उवाच

एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

ऐसें तिये अवसरीं । अर्जुनु बोलिला समरीं । संजयो ह्मणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥ २६६ ॥ मग अत्यंत उद्वेगला । नंधरे[10] गहिंवरु[11] आला । तेथ उडी घातली खाला । रथौनिया

---

१ ययावरि—सिद्ध; यावरि—मा, सा. २ ज्यावें—मा. ३ तयापासौनि- सिद्ध, मा; तयापासूनि—सा. ४ सांडूनि—सा. मा; सांडुनि—सिद्ध. ५ यांचे—सा, मा, सिद्ध. ६ तयावरि—सिद्ध; तयावरी-मा, सा. ७ होय-सा, मा; होये-सिद्ध. ८ जितुकें-सिद्ध, मा, सा. ९ वरि- सा. * "ऐसे देखोनि सकल । अर्जुनें आपुलें कुल । मग ह्मणे राज्य तें केवल । निरयभोगू ॥" ही ओवी सा. मा, व सिद्ध-नाथ प्रतींत अधिक असून, ती तेथे २६७ म्हणून दिली आहे. १० न धरतु-मा, सिद्ध; न धरत— सा. ११ गहिंवरु- मा, सा.

॥ २६७ ॥ जैसा राजकुमरु[1] पदच्युतु[2] । सर्वथा होये उपहतु[3] । कां रवि राहुग्रस्तु । प्रभाहीनु ॥ २६८ ॥ ना तरि महासिद्धि- संभ्रमें । जींतला[4] तापसु भ्रमें । मग आकळूनि[5] कामें । दीनु[6] कीजे ॥ २६९ ॥ तैसा तो धनुर्द्धरु । अत्यंत दुःखें जर्जरु । दीसे,[7] तेथ राहंवरु[8] । त्यजिला तेणें ॥ २७० ॥ मग धनुष्यबाण सांडिले । नधरत अश्रुपात आले । ऐसें[9] आइकैं तेथं[10] वर्त्तलें । संजयो ह्मणे ॥२७१॥ आतां यावरि वैकुंठनाथु[11] । देखौनि[12] सखेदु[13] पार्थु । कवणी[14] परी परमार्थु । निरोपील[15] ॥२७२॥ ते सविस्तर पुढां[16] कथा । अति सकौतुक आइकतां । जें ज्ञानदेओ[17] म्हणैल[18] आतां । निवृत्तिदासु[19] ॥ २७३ ॥

ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादो नाम प्रथमोध्यायः ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु



१ राजकुमर—मा, सा. २ पदच्युत—सिद्ध. ३ उपहत—सिद्ध. ३ जिंतिला—सा, मा; जिंतला—सिद्ध. ५ आकळूनि—मा, सा. ६ दीन—मा, सिद्ध. ७ दिसे—सा, सिद्ध, मा. ८ रहंवरु—मा, सा. ९ ऐक--सा. १० राया तेथ-सा, मा, सिद्ध. ११ तो वैकुंठनाथु--सा, मा, सिद्ध. १२ देखोनि--सिद्ध. १३ सखेद—मा, सा. १४ कवणेपरी--सिद्ध, सा, मा. १५ निरूपील--मा, सा; निरूपिल--सिद्ध. १६ पुढारीं--सा, मा. १७ ज्ञानदेव--सा. मा. १८ ह्मणेल--सिद्ध; म्हणे--सा, मा. १९ निवृत्तिदास—मा, सा.

# प्रस्तुत अध्यायांतील ठळक विषय



१ परब्रह्मास नमन--( ओ १ )

२ शब्दब्रह्मस्वरूपी गणेशाला नमन --( ओ २ २० )

३ शारदानमन-( ओ २१ )

४ गुरु निवृत्तिनाथ यांना नमन-( ओ. २२-२७ )

५ महाभारत व महाभारतकार व्यासमहर्षि यांची प्रशंसा—
( ओ. २८-४९ ).

६ श्रीमद्भगवद्गीतामहति ( ओ. ५०-५५ )

७ ज्ञानेश्वरांची श्रोत्यांपासून एकतानतेची अपेक्षा-(ओ.५६-६२)

८ ज्ञानेश्वरांनीं अत्यंत विनयानें केलेली श्रोत्यांना विनवणी —
( ओ. ६३-६५ ).

९ अंगीकृत गीताटीकेच्या कार्याचें कठिणत्व ( ओ. ६६-८४ )

१० पांडवसैन्यवर्णन ( ओ. ८८-९२ )

११ भीष्माचा गौरव ( ओ. ११५-११८ )

१२ भीष्माच्या सिंहनाद व शंखनादाचा अद्भुत परिणाम—
( ओ. १२५-१३० )

१३ रणवाद्यांच्या भयंकर निनादानें योध्द्यांची झालेली दाणादाण-
( ओ. १३४-१३७ )

१४ अर्जुनरथवर्णन ( ओ. १

१५ पांडवांच्या शंखनादानें ओढवलेल्या प्रलयाचें वर्णन— ( ओ.१५४-१   )

१६ अर्जुनाच्या वृत्तीवरून श्रीकृष्णांना आलेला संशय— ( ओ. १७६-१७२ )

१७ अर्जुनाच्या मनांत करुणेचा उदय व वीरवृत्तीचा अस्त— ( ओ. १८५-१९५ )

१८ स्नेहाचे असाधारण सामर्थ्य ( ओ. १९८-२०६ )

१९ अर्जुनाची श्रीकृष्णाबद्दलची आस्था ( ओ. २२७-२३२ )

२० कुलक्षयापासून ओढवणारी अनर्थपरंपरा-( ओ. २४३-२५५ )

२१ संगदोषानें घडणारा घोर परिणाम ( ओ. २५६-२६२ )

२२ अर्जुनाची केविलवाणी अवस्था ( ओ. २६५-२७१ )



# अध्याय पहिला
## टीपा व स्पष्टीकरण



आपल्या नेहमींच्या प्रथेस अनुसरून प्रारंभीं आपल्या ग्रंथाचा प्रस्ताव करतांना ज्ञानेश्वरांनीं प्रस्तुत अध्यायाच्या पहिल्या ८४ ओव्यांत ज्या अनेक विषयांचा उल्लेख केला आहे, त्यांत (१) परब्रम्हाला नमन (२) शब्दब्रम्हस्वरूपी गणेशाला वंदन, (३) शारदानमन (४) स्वतःचे गुरु निवृत्तिनाथ यांना नमन (५) महाभारतकार व्यास यांची प्रशंसा (६) श्रीभगवद्गीतामहति (७) श्रोत्यां-बद्दलची अपेक्षा (८) श्रोत्यांना विनंति व (९) आपण अंगीकारलेल्या ग्रंथरचनेचें काठिण्य, इत्यादि अनेक विषय आलेले आहेत. कोणताही ग्रंथ आरंभतांना, तो पूर्णपणें तडीस जावा, मध्ये कोणतेंही विघ्न येऊं नये, यासाठी आपल्या समुचित इष्ट देवतेचा "आशीर्नमस्क्रिया वस्तुनिर्देशोवाऽपि तन्मुखम्" या न्यायानें नमन करण्याची सर्वच ग्रंथकारांची प्राचीन परंपरा आहे. ज्ञानेश्वरांनीं देखील या श्रेष्ठ परंपरेला अनुसरून आपलें उपास्य दैवत जें निर्गुण निराकार परब्रह्म, त्यालाच वंदन केलें आहे. ज्ञानेश्वरासारख्या ब्रह्मैक्य पावलेल्या अधिकारी पुरुषानें, एकाद्या प्राकृत ग्रंथकाराप्रमाणें इष्ट देवतेला नमन करण्याचा हा द्वैती मार्ग अवलंबावा, हें कित्येकांना थोडें चमत्कारिक वाटेल. पण भगवद्गीतेवर टीका लिहून, बहुजन-समाजाला अध्यात्मोपदेश करण्याचें लौकिक व मायामय कार्यच त्यांनीं हातीं घेतल्यामुळें, ग्रंथारंभीं इष्टदेवतेला साकार समजून तिला वंदन करण्याचा लौकिक-मार्गही त्यांना अवलंबावा लागला.

**ओ. १**– ॐ हें शब्दब्रह्मालाच अनुलक्षून आहे. ॐ इति एकाक्षरं ब्रम्ह, असें वचन आहे. शिवाय ब्रम्हदेवाच्या तोंडांतून प्रथमतः ॐ कारच निघाल्यानें, कोणत्याही वाङ्मयीन कृतीला प्रारंभ करतांना, ॐकार लिहिण्याची चाल आहे. **आद्या**-सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वीचा, ज्याच्यापूर्वी दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचा उद्भव नव्हता असा, परमात्मा. ज्याच्या लीलेनें अथवा मायेनें हें

जग नंतर निर्माण झालें. ' आत्मा हाच काय तो एकटा प्रथम होता, ' अशा अर्थाचीं वचनें ऐतरेय व बृहदारण्यकांत आहेत, त्याच अनुसंधानानें ज्ञानेश्वरांनीं परब्रह्माला ' आद्या ' म्हटलें आहे. **वेदप्रतिपाद्या**- वेदांकडून वर्णिला गेलेला किंवा वेदांनीं ज्याचें वर्णन करावें असा. परमात्म्याचें स्वरूप आतांपर्यंत अनेक उपनिषदांतून वर्णन केलें गेलें आहे. **स्वसंवेद्या**--स्वतःच केवळ जाणण्यास शक्य. ज्याचें ज्ञान साधकानें आपल्या आपणच करून घेतलें पाहिजे दुसऱ्याच्या सांगण्यानें तें होणार नाहीं असा. **आत्मरूपा**--परब्रह्म हें प्रत्येक जीवांत आहेच. म्हणून जीवात्मा व परमात्मा यांचें ऐक्य दर्शविण्यासाठीं, येथें आत्मरूपा असें म्हटलें आहे. **ओ. २** येथून वीस ओवींपर्यंत गणेशस्वरूपाचें वर्णन आलें असलें, तरी पहिल्या ओवींत वर्णिलेला परमात्मा तोच गणेश, असें येथें स्पष्टपणें सांगितलें आहे. ज्ञानेश्वरांनीं प्रथम परमात्म्याला नमन केलें पण कोणताही ग्रंथ लिहितांना गणेश व शारदा यांना नमन करण्याची लौकिक प्रथा असल्यानें या परमात्म्यालाच गणेश कल्पून त्यांनीं नेहमीचा गणपतिपूजनाचा सांप्रदायही पाळला. गणपति हा बुध्दिदाता असल्यानें, त्याला प्रथम वंदन करण्यांतही येथें औचित्य आहे. **सकलार्थप्रकाशु**- गणपति हा सर्व विद्यांचा अधिष्ठाता असल्यानें, तो सर्व प्रकारच्या अर्थावर प्रकाश पाडणारा आहे. सर्व अर्थ त्याच्यामुळें सुगम होतात असा. **निवृत्तिदासु**--निवृत्तिनाथांचा दास, सेवक, ज्ञानदेव. निवृत्तिनाथ हे ज्ञानेश्वरांचे वडील बंधु व अध्यात्मिक गुरु. म्हणून आपला उल्लेख ज्ञानेश्वरांनीं येथें ' निवृत्तिदास ' या सूचक विशेषणानें केला आहे. **अवधारिजो**- अवधारणें=ऐकणें. ' हे परब्रम्हा ! तूंच सर्व अर्थावर प्रकाश पाडणारा गणेश आहेस, ' हें ज्ञानदेवाचें म्हणणें ध्यानांत धरा. " **ओ. ३.** येथून ज्ञानेश्वर या गणेशाचें सालंकार व सावयव वर्णन करतात. पण ज्ञानेश्वरांनीं परब्रम्हालाच गणेश म्हटल्यानें, त्यांचा गणेश नेहमीच्या गणपतीप्रमाणें नसून तो वाङ्मयीन आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. ज्ञानेश्वरांच्या गणेशाची मूर्ति शब्दब्रम्हाची असल्यानें तिचे इतर अवयव व अंगावरील आभरणें देखील मग तशींच वाङ्मयीन असणार हें उघड आहे. ज्ञानेश्वरांनीं वास्तविक येथें परब्रम्हावर गणेशाचें रूपक करून एकीकडून गणेशाला, तर दुसरीकडून वाङ्मयालाच नमन केलें आहे. **शब्दब्रह्म**-- वेद. ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, व अथर्ववेद हे चार वेद, हीच ज्याची रेखीव

मूर्ति आहे. परब्रम्हाचें वर्णन वेदांकडूनच होत असल्यानें, ज्ञानेश्वरांचें या परब्रह्मस्वरूपी गणेशाची मूर्ति वेदांची आहे, हें म्हणणें योग्यच आहे. **वर्णवपु**-वेदांतील निर्दोष अक्षरें हेंच या गणेशाचें शरीर होय. **मिरवत असे**--मिरवणें-शोभणें. **ओ. ४ —स्मृति इ.**—मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति इत्यादि ज्या अनेक स्मृती आहेत, त्याच या गणेशाचे अनेक अवयव होत **रेखा**--मर्यादा. निरनिराळ्या शास्त्रांच्या मर्यादा. **आंगिक भाव**-- शरीराची ठेवण. भिन्न भिन्न स्मृतींनीं घालून दिलेल्या शास्त्रमर्यादा, याच या गणेशाच्या शरीराची ठेवण होत. **अर्थशोभा**-- या स्मृतींनीं आपले नियम व्यक्त करतांना दाखविलेलें अर्थसौंदर्य, ही या गणेशाच्या लावण्याची स्वाण होय. **टव**—खाण, सांठा. **ओ ५**-- आठरा पुराणें हेंच या गणेशाच्या अंगावरील रत्नजडीत अलंकार असून, अशा पुराणग्रंथांत मांडलेले सिद्धांत हीं रत्नें व तेथें योजलेली भाषापद्धति ही त्या रत्नांना लागणारी कोंदणेंच आहेत **प्रमेय**--सिद्धांत. **खवणें**--कोंदण. **ओ ६**-- वाङ्मयांत अवलंबिलेली कौशल्ययुक्त पद्यरचना, हेंच या गणेशानें परिधान केलेलें रंगीत वस्त्र असून, अशा पद्यरचनेंत दिसणारें उज्ज्वल साहित्यगुण म्हणजेच त्या वस्त्राचा बारिक तलम वाण होय. येथें ' पद्यबंध ' असाच पाठ घेतला पाहिजे; कारण त्या वेळीं जी रचना होत होती, ती बहुतांशीं पद्यांतच होत असे. **नागर**-सुंदर. शहरांतील लोकांनीं केलेली पद्यरचना अर्थातच विशेष चातुर्याची असणार. **रंगाथिलें**-रंगानें युक्त. ' अंगाथिले ' हा पाठ घेऊन त्याचा अर्थ ' विणलेलें ' असा केल्यास, त्यांत ' नागर ' या शब्दाचें स्वारस्य राहत नाहीं. नागरवस्त्रें जशीं चित्रविचित्र असतात, तशीं खेड्यांतलि असत नाहींत. **वाणें**--वाण, विणकर. **सपुर**—पातळ, बारीक. या शब्दाचा ' अगदीं भरगच्च ' हा रा. हर्षे यांनीं दिलेला अर्थ बरोबर वाटत नाहीं. कारण भरगच्च विणीचें वस्त्र नागर असणार नाहीं. शिवाय तेथें कौशल्याचा भाग विवक्षित असल्यानें सपुर=तलम, असाच अर्थ घेणें युक्त आहे. महानुभावी कवि नरेंद्र, यानें तो तशा अर्थानें वापरलाही आहे. पहा- " मृणाळ सुता पासौनि सपुरा । चंद्रुकळुनि सुटेति धारा । येरीचां वेळ्ळां येरी सुभरा । भरेति सूत्रें ॥४३१॥रु. स्व. **उजलाचे**-उज्वल. **ओ. ७** आतां काव्यनाटकांचा कौतुकानें विचार केल्यास, त्याच या गणेशाच्या वस्त्राच्या पदराला लावलेल्या, रुणझुण अशा अर्थध्वनीनें वाजणाऱ्या

घागऱ्या होत. काव्यनाटकांना रुणझुणणाऱ्या घागऱ्यांची उपमा देण्यांत ज्ञानेश्वरांनीं रसिकता व औचित्य दाखविलें आहे. काव्यनाटकासारखें वाङ्मय रुणझुणणाऱ्या घागऱ्यांच्या कर्णमधुर ध्वनीप्रमाणें, आपल्या लालित्यानें वाचकाच्या मनाला रिझविणारेंच असतें. मनाला विरंगुळा देणाऱ्या अशा वाङ्मयाकडे अध्यात्मिक दृष्टीच्या ज्ञानेश्वरांनीं दुर्लक्ष केलें नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. **क्षुद्रघंटिका**—घागऱ्या. येथें या घागऱ्या वस्त्राच्या पदराला लावलेल्या असें न रा. हृष्यांप्रमाणें घेणें युक्त आहे. कारण रा. आगाशे म्हणतात तसा पैंजणांचा येथें उल्लेख नाहीं. पूर्वी वस्त्राच्या पदराला घुंगुर लावण्याची चाल असावी. **अर्थध्वनि**-( तृ. ) अर्थध्वनीनें. काव्यनाटकांतील अर्थरूपी ध्वनीनें, आवाजानें. **ओ. ८** " निरनिराळ्या सिद्धांतांच्या प्रकाराकडे जों थोड्या मार्मिकपणानें पहावें, तों तीं औचित्यपूर्ण शब्दांच्या कोंदणांत बसविलेलीं उज्ज्वल रत्नेंच आहेत असें दिसून येतें. " **परि** प्रकार. **पांतां**—पाहतां. **निपुणपणें**—सूक्ष्मपणें, मार्मिकपणानें. **पदें माझारि**—पदामध्यें, शब्दामध्यें बसविलेलीं. वरील ५, ६, ७, ८ या ओंव्या पाहिल्यास पदपद्धति, अर्थध्वनि व उचितपदें या शब्दांनीं ज्ञानेश्वरांनीं, रीति, ध्वनि व औचित्य या साहित्यशास्त्रांतील प्रमुख तत्त्वांचा उल्लेख करून, आपलें त्या शास्त्रांतील प्राविण्य व्यक्त केलें आहे. **ओ. ९**—" त्या गणेशाच्या मूर्तीच्या ठिकाणीं व्यासादिकांच्या प्रतिभा, त्याच्या मेखलेच्या पदरांच्यारूपानें झळकतांना दिसतात. ' येथें व्यासादि महाकवींच्या तरल व उज्ज्वल प्रतिभेला, या गणेशाच्या मेखलेच्या दोनी बाजूंना रुळणाऱ्या पदरांची उपमा फारच औचित्यपूर्ण आहे. मेखलेचे, कडदोऱ्याचे पदर जसे मोकळे सोडलेले, सर्वत्र इतस्ततः हालतात, तशीच महाकवींची प्रतिभा देखील सर्वत्र विहार करते. **मती**—बुद्धिमत्ता, प्रतिभा. **चोखउपणें**—सुंदरपणानें. **पल्लवसडका**-पदराच्या दशा. पण येथें मेखलेचे पदर असाच अर्थ करणें युक्त आहे. **ओ. १०**-" असें पहा कीं, जीं सहा दर्शनें म्हटलीं जातात, तेच या गणेशाचे सहा हात असून, या सहा शास्त्रांत परस्परांत असणारे विरोध, हींच त्या सहा हातांतील भिन्न भिन्न आयुधें होत. " **षड्दर्शनें**- सांख्य, योग, वैशेषिक, न्याय, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा, ही सहा दर्शनें किंवा शास्त्रें होत. **म्हणिपाते**-म्हटलीं जातात ( कर्मकर्तरी प्रयोग ). येथें हीं सहा दर्शनें हे या गणेशाचे सहा हात म्हटले आहेत, हें विशेष उल्लेखनीय आहे. कारण ज्ञान-

भुजांच्या या परब्रह्मस्वरूप गणेशाला, इतर गणेशाप्रमाणें चार हात नसून सहा हात आहेत. **विसंवादें**-याचा संबंध 'आयुधानें' याकडे आहे वगैरे सहा शास्त्रांचा परस्परांतील जो सहा प्रकारचा विरोध तोच या गणेशानें हातांत धर-लेली आयुधें होत. पुढील दोन ओंव्यांत याच आयुधांचा उल्लेख केला आहे. परशु अंकुश, मोदकु, खंडित दंत, पद्मकर वरदहस्त व अभयहस्त, अशा आयुधांनीं हे सहा हात गुंतलेले आहेत. **ओ ११** तर्क हाच परशु, नीति-भिन्नता हा अंकुश, व वेदांत हाच सुरस मोदक. अशा रितीनें या तीन हातांत हीं तीन आयुधें झालीं. कित्येक वेळा तर्कानें, युक्तिवादानें कांहीं भ्रामक गोष्टी तोडून टाकाव्या लागतात. म्हणून तर्काला परशूची, कुऱ्हाडीची उपमा दिली आहे. **नीतिभेदु**-- नीतिशास्त्रांतील भिन्न मत प्रसंगविशेषीं धडाडीनें पुढें केलेला नीतिवाद हाच अंकुश. गणेश हा गजवदन असल्यानें त्यानें अंकुश घेणें युक्तच आहे **मोदकु**--गणपति हा मोदकांचा भोक्ता आहे येथें त्यानें वेदांत-रूपी सुरस मोदक हातांत घेतला आहे वेदांत हा ज्ञानेश्वरांचा आवडता, जिव्हा-ळ्याचा विषय असल्यानें, त्यांनीं त्याला गोड मोदक म्हणावें हें साहजिक आहे.

**ओ. १२** " आता या गणेशाच्या चवथ्या हातांत मीमांसकांनीं मोडून-काढलेल्या बौद्धमताचा निदर्शक असा मोडका दांत, आहे. " मीमांसकांनीं खंडन केलेलें बौद्धमत म्हणजेच गणेशानें घेतलेला मोडका दांत, असे म्हणण्यांत ज्ञानेश्वरांनीं येथे बौद्धमताबद्दलची आपली नापसंती व त्या मताच्या खंडनाबद्दल आपलें समाधान व्यक्त केलें आहे. गजासुराबरोबर झालेल्या युद्धांत गणपतीनें आपल्या परशूनें त्या असुराचा दांत तोडला व तोच त्यानें बिरुद म्हणून हातांत धारण केला, या पौराणिक कथेला अनुसरून ज्ञानेश्वरांनीं या गजासुराच्या मोड-क्या दातांवर खंडित बौद्धमताचें हें नवीन रूपक बसविलें आहे. **वार्तिकांचा**—याचा संबंध 'खंडितु' याकडे घ्यावा. वार्तिककारांकडून खंडित झालेला. **वार्ति-ककार**- टीकाकार. बौद्धमतावर खंडनपर टीका करणार. **ओ. १३** - " मग सहजच सत्तर्कवाद तोच वर देणारा पद्मकर असून, धर्मप्रतिष्ठा हाच अभय देणारा सहावा हात होय. **सत्तर्कवाद**- उत्तम तर्कपद्धतीस अनुसरून प्रतिपादलेलें मत, हाच लीलाकमळ घेतलेला भक्ताला वर देणारा हात. गणपतीच्या हातांत कमल असतें. त्या कमलमंडित हातालाच सत्तर्कवाद म्हटल्यानें, तर्कशास्त्राधिष्टित

मताचा ज्ञानेश्वरांनीं येथें पुरस्कारच केला आहे. **धर्मप्रतिष्ठा**-- धर्माची संस्थापना हाच अभय देणारा हात. या रूपकानें धर्मस्थापनेंतच निर्भयता आहे, धर्मस्थापना असल्यावर कशाचेंही भय नाहीं, हे ज्ञानेश्वरांनीं येथें सूचित केलें आहे. **साहाजे**-- सहजपणें. **ओ. १४**-' तेव्हां असें पहा कीं, जो शुध्द असा सारासार विचार, तोच या गणेशाचा सरळ शुंडादंड असून तेथेंच ब्रह्मानंदाच्या महासुखाचा लाभ घडतो." **तंव**—तेव्हां. **विवेक** – सारासार विचार. शुध्द सारासार विचारालाच गणेशाच्या सरळ सोंडेची उपमा दिली आहे. सोंडेनें ज्याप्रमाणें गजाला रसास्वादानें सुख मिळतें, त्याप्रमाणें साधकाला विवेकानें परब्रह्माच्या समाधीचें महासुख अनुभवितां येतें. राजवाडे व सिध्दनाथ या प्रतींत येथें ' विवेकवंत ' असा पाठ घेऊन ' विवेकनिपुण श्रोते हो ! " असा त्याचा अर्थ करण्यांत आला आहे. पण एका एका भावावर अथवा गुणावर गणेशाच्या आयुधाचें वा अवयवाचें रूपक करण्याची ज्ञानेश्वरांची पद्धति पाहतां, येथें ' विवेक तंव ' हाच पाठ बरोबर असावा असें वाटतें. ' विवेकवंत ' असें मध्येंच श्रोत्यांना अनुलक्षून हांक मारण्याचें ज्ञानेश्वरांना कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. **परमानंद**—ब्रह्मानंद हाच परमानंद असून, त्यांतच योग्याला आत्यंतिक सुखाचा लाभ घडतो. **ओ. १५** निरनिराळ्या मतांचा समन्वय हाच गणेशाचा दंत असून, समता हाच त्याचा शुभ्रवर्ण व ज्ञान हेच त्याचे बारिक डोळे आहेत. असा हा विघ्नराज देव आहे. ' एकदंताय विद्महे । ' असें गणपतीचें वर्णन आहे. म्हणून भिन्न भिन्न मतांचें ऐक्य, याला या गणेशाचा एकमेव दंत म्हटलें आहे. त्याचप्रमाणें गणपति हा कर्पूरगौर शुभ्रवर्णाचा आहे. म्हणून समतेसारख्या शुभदायक गुणावर, त्याच्या शुभ शुभ्रवर्णाचा आरोप केला आहे. परब्रह्माच्या ठिकाणी असलेली समत्वबुद्धि, हीच गणेशाच्या शुभ्रवर्णानें सूचित होते. **उन्मेख**--ज्ञान, ब्रह्मज्ञान, आत्मापरमात्मैक्य ज्ञान, हेच या गणेशाचे दोन बारिक डोळे. हत्तीचें शरीर मोठें असल, तरी डोळे बारीकच असतात. ज्ञानी माणसाची दृष्टी देखील अर्धोन्मीलित असते. म्हणून गणपतीची अशी किलकिली दृष्टीच ज्ञानदृष्टि होय असें सूचित केलें आहे. असा हा विघ्नराज गणेश इतर देवांहून भिन्न आहे. **ओ. १६** – ' पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या दोन मीमांसा, या गणेशाचे दोन कान असल्याचें मला कळून चुकलें, व त्या कानांवरून वाहणारा बोधरूपी मद, मुनिरूपी भ्रमर सेवन करीत आहेत.

**दोन्ही मीमांसा**—पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा. पूर्वमीमांसेंत कर्मकांडाचें व उत्तरमीमांसेंत ज्ञानकांड अथवा व वेदांताचें विवरण केलें आहे. या दोन मीमांसांना गणेशाचे दोन कान कल्पून, ज्ञानेश्वरांनीं कर्मकांड व ज्ञानकांड यांची आवश्यकता प्रतिपादली आहे. या दोन मीमांसांच्या द्वारां मिळणारा बोध तोच या गणेशाच्या कानावरून वाहणारा मद होय, व तोच मुनिरूपी भ्रमर चाखतात. साधकाला प्रथम कर्मकांड अवलंबावें लागतें, व नंतरच ज्ञानमार्गानें त्याला ब्रह्मप्राप्ति होते. हत्तीच्या कानावरून त्याचा मद वाहत असतो व त्यावर भ्रमर लुब्ध असतात असा संकेत आहे, त्यालाच अनुसरून हें वर्णन आहे. **अवगमणें**-उमगणें, समजणें. **ओ १७**—" सिद्धांतरूपी पोवळ्यांनीं कांतिमान् झालेलीं द्वैत व अद्वैत मतांचीं निदर्शक अशीं दोन गंडस्थळें, त्या गजमस्तकावर एकत्र झाल्यासारखीं होतीं." द्वैत, अद्वैत हीं गणपतीचीं दोन गंडस्थळें तेथें एकोप्यानें नांदतात, असें म्हणून ज्ञानेश्वरांनीं येथें द्वैत व अद्वैत या दोन उपासनामार्गांचें एकत्वच सूचित केलें आहे. **सरिसें**-सारखेंच. **एकवटति**-एकत्रित होतात, एकत्व पावतात. **ओ. १८**—' या गणेशाच्या मस्तकावरील मुकुटावर ज्ञान-मकरंदानें परिपूर्ण अशीं मुख्यानेक दशोपनिषद्रूपी सुंदर फुलें शोभत आहेत." दशोपनिषदांना फुलांची उपमा दिल्यावर त्यांतील तत्त्वज्ञानाला मकरंद म्हणणें ओघानेंच येतें. या ज्ञानयुक्त दशोपनिषदांना गणेशानें आपल्या मस्तकीं पुरः-स्सरानें घेण्यात, या उपनिषदांतील तत्त्वज्ञानाचा गौरवच सूचित करण्याचा ज्ञानेश्वरांचा आशय आहे.

**ओ. १९**—येथें ओंकाराचें वर्णन करून त्यांतील अ, उ व म् या तीन अक्षरांनीं गणेशाच्या अनुक्रमें चरण, उदर व मस्तक या अवयवांशीं साधर्म्य दाखवितात. " ओंकारांतील अ कार हे दोन पाय, उकार हेंच गणेशाचें विशाल पोट व मकार हेंच त्याचें वर्तुळाकार मस्तक होय." **ओ. २०**—' अशीं हीं तीन अक्षरें जेथें एकत्र येतात, तेथेंच शब्दब्रह्म व्यापून असतें. असें हें सर्व जगाचें आदिबीज मी माझ्या गुरूच्या कृपेनें नमिलें." गुरुकृपेनें ओंकाररूपी शब्दब्रह्माचें मला आकलन होऊन, त्याला नमन करण्याचें भाग्य लाभलें असें ज्ञानेश्वर म्हणतात. **कवळणें**-व्यापणें. **ओ. २१**—या ओवींत शारदेला वंदन केलें आहे. **अभिनव इ.**—नवनवीन वाङ्मयनिर्मितीचे विलास करणारी,

**चातुर्यकळाकामिनी**—कला व कौशल्य यांची अभिरुचि असणारी. **विश्व-मोहिनी**—विश्वाला आपल्या विलासांनीं मोहित करणारी. अशी शारदा मी नमिली. **ओ. २२**—येथून ओ. २७ पर्यंत, ज्ञानेश्वर आपल्या गुरूंना नमन करतात. " माझ्या हृदयांत असणाऱ्या माझ्या गुरूनें संसाराच्या पुरांतून मला तारलें. म्हणूनच विवेकाबद्दल माझ्या बुद्धीला आदर वाटतो. **विवेक**—नित्यानित्य विचार. गुरूंच्या कृपेनें मला नित्यानित्य विचार कळल्यामुळें, मला या संसाराच्या पुरांतून पार होता आलें.

**ओ. २३**— ज्याप्रमाणें डोळ्यांला अंजन मिळालें कीं, आडपडदा नाहींसा होऊन दृष्टीला दिसूं लागतें, मग ज्या दिशेकडे पहावें तेथें महानिधि प्रकट होतो." पायाळूनें विशिष्ट प्रकारचें अंजन डोळ्यांत घातलें असतां त्याला भूमिगत द्रव्य दिसतें अशा प्रकारची समजूत ज्ञानेश्वरकालीं होती. ज्ञानेश्वरांनीं हा दृष्टांत आपल्या ग्रंथांत ठिकठिकाणीं दिला आहे. **भेटे**—प्राप्त होई. **पाटा फुटणें**- आड पडदा नाहींसा होणें, दिसणें पहा—" जो श्रीकृष्णु वेदां नव्हे ठाउका । निरुता नेणवे तिहीं लोकां । तेथ काइ पाटा फुटे आणिका । फुलीएचनि ज्ञानें ॥ २९ ॥ –नरेंद्र, रु. स्व. रा. हर्ष्यांनीं येथें ' पहाट फुटणें ' असा पाठ स्वीकारला आहे. पण यादवकालीं ' पाटा फुटणें ' अशी म्हण भाषेंत रूढ होती, असें महानुभावी वाङ्मयावरून दिसून येतें. त्याअर्थी ' पाटा फुटे ' हाच पाठ बरोबर आहे. त्याचप्रमाणें ' वास पाहणें ' हाही वाक्संप्रदाय तत्कालीं रूढ होता. **वास पाहणें**—एकाद्याकडे हेतुपूर्वक पाहणें. पहा—" आनंदभरित वास पाहों लागलें " गोविंदप्रभुचरित्र-८; " मग प्रधानाची वास पाहिली । बोलिला ऐसें—" नरेंद्र, रु. स्व. ११५. येथें ज्ञानेश्वरांच्या या दृष्टांताचा आशय असा कीं. डोळ्यांत अंजन घातलें म्हणजे ज्याप्रमाणें भूमिगत द्रव्य दिसूं शकतें. तसेंच आपणास निवृत्तिनाथ गुरूंच्या कृपेचें अंजन प्राप्त झाल्यामुळें, आपणास ब्रम्हसाक्षात्काराचा महानिधि सहजच हातीं आला आहे. **ओ. २४**—ज्ञानेश्वर आपणावर झालेल्या गुरुकृपेवर आणखी दृष्टांत देतात. " किंवा हातांत चिंतामणि प्राप्त झाल्यावर जसा मनोरथावर सदा विजय मिळवितां येतो, त्याप्रमाणें निवृत्तीनाथांमुळें मी पूर्णकाम झालों आहे. " **चिंतामणि**—इच्छिलेली वस्तु देणारा मणि. हा हातांत असल्यावर ज्याप्रमाणें इच्छिलेली कोणतीही वस्तु मिळते, तद्वतच

निवृत्तिनाथ हे गुरु आपणास लाभल्यामुळें, आपल्यास इच्छित वस्तु मिळून आपण तृप्त झालों आहे, असें ज्ञानदेवाचें म्हणणें. मागील ओंवींत विशिष्ट अंजनाचा तर या ओंवींत चिंतामणीचा दृष्टांत ज्ञानेश्वरांनीं गुरुवर कल्पिला आहे. **हातीं होणें**--प्राप्त होणें, हातीं लागणें. **विजयपण** इ०—मनोरथावर जय मिळवितां येतो, इच्छिलेली वस्तु मिळवितां येते. **निवृत्ती**—ही तृतीया आहे–निवृत्तीमुळें. **ओ. २५**–" ज्याला कृतार्थ व्हावयाचें आहे, त्या जाणत्या माणसानें गुरूची सेवा करावी. ज्याप्रमाणें वृक्षाच्या मुळाला पाणी घातलें असतां, शाखा व पल्लव आपोआपच निघतात, फुटतात. ज्ञानेश्वरांच्या म्हणण्याचा आशय असा कीं, वृक्षाच्या मुळाला पाणी घातलें कीं, जशी शाखापल्लवांनीं वृक्षाची वाढ होते, तद्वतच ज्ञानवृक्षाचें मूळ जे गुरू, त्याची सेवा केली असता, शिष्यशाखाही ज्ञानसंपन्न होऊन टवटवीत होतात. वृक्षाचें मूळ जसें शाखापल्लवांच्या वृद्धीला अभाविनपणें कारणीभूत होणारें आहे, त्याप्रमाणें गुरु हेच शिष्यांच्या ज्ञानवृद्धीला कारण असल्यानें, त्याची सेवा करणें प्राप्त आहे.

**ओ. २६**—ज्ञानेश्वर आणखी दृष्टांत देतात. एका गुरूच्या वंदनांत सर्व आलें हें सांगतांना, त्यांनीं समुद्राचा व अमृताचा व्यापक, विशाल पण मनोहर दृष्टांत दिला आहे. " एकट्या समुद्रांत स्नान केलें असतां, त्रिभुवनांत जेवढीं म्हणून तीर्थे आहेत, त्या सर्वांत स्नान केल्याचें पुण्य मिळतें. किंवा एका अमृताच्या आस्वादानें पृथ्वीतील सर्व रस प्याल्याचें श्रेय मिळतें. " ज्ञानेश्वरांच्या म्हणण्याचें तात्पर्य असें कीं, एका गुरूला वंदन केल्यानें आपणास सर्व देवांना वंदन केल्याचें श्रेय मिळणार आहे. **अवगाहन**—स्नान. **ओ. २७**–**पुडतीं पुडतीं**—पुनः पुनः; वारंवार. **अभिलाषित**—इच्छित. जो गुरु सर्व इच्छित मनोरथ पुरविणारा आहे. **ओ. २८**—येथून ४९ ओंवीपर्यंत ज्या महाभारत ग्रंथाचा भगवद्गीता हा एक भाग आहे, त्या महान् ग्रंथाची थोरवी वर्णन केलेली आहे. **अवधारा**—ऐका. **कथा**—महाभारतांतर्गत कथा. जी भारतीय कथा, कलेला व कौतुकाला कारणीभूत झाली आहे. ज्या कथेची रचना करतांना व्यासाना आपलें कलाकौशल्य दाखविण्याची संधि लाभली. **विवेकतरूचे**—सारासार विचाराचे, नित्यानित्यवस्तूच्या विचाराचें, जी भारती कथा केवळ अभिनव उद्यानच आहे. महाभारतांत अनेक अध्यात्मिक प्रश्नांचा ऊहापोह आला असल्यानें, त्याला

विवेकतरूचें केवळ उद्यानच म्हटलें आहे. **ओ. २९**—किंवा हा महाभारतग्रंथ म्हणजे ब्रह्मानंदाचें उगमस्थानच होय. ज्या ग्रंथांत वेदांतादि अनेक शास्त्रांचें ज्ञान मिळून, परब्रह्मसाक्षात्काराचा लाभ घडतो. **प्रमेय महानिधि**—जो ग्रंथ अनेक शास्त्रसिद्धांचा साठा आहे. महाभारतांत वेदांत, धर्मशास्त्र, इतिहास, पुराण, काव्य, इत्यादि, अनेक शास्त्रांचा समावेश झाल्यानें, सर्वच शास्त्रांचे सिद्धांत त्यांत समावले आहेत. " जे या ग्रंथांत नाहीं, तें कोठेंच नाहीं " अथवा " व्यासांनीं सर्व जग उष्टें करून टाकलें " असें या ग्रंथाबद्दल अभिमानानें म्हणता येते. **ना ना**-किंवा. **नवरससुधाब्धि**-नवरसांनीं भरलेला अमृतसागरच. ज्या ग्रंथांत अमृताप्रमाणें असणारे शृंगारादि नवरस ओतप्रोत भरलेले आहेत. म्हणजे काव्याच्या दृष्टीनेंही नवरसात्मक म्हणून या ग्रंथाला मोठें महत्त्व आहे.

**ओ. ३०**—किंवा हा महाभारतग्रंथ म्हणजे परमेश्वराचें परम धामच होय. **परमधाम**-परमेश्वराचें अधिष्ठान, ब्रह्मनिर्वाण. पहा—' तद्धाम परमं मम. " ज्या ग्रंथाच्या वाचनानें परमेश्वराचें अधिष्ठान लाभतें, असा हा ग्रंथ आहे. **मूलपीठ**--महाभारत हा सर्व विद्यांचें व कलांचें आदिस्थान आहे. येथूनच सर्व विद्यांचा व कलांचा उगम झाला आहे. वर २८ ओंवींत देखील ' कलाकौतुका जन्मस्थान ' असें म्हटलेंच आहे. **शास्त्रजाता** इ.--सर्वशास्त्रांना हा ग्रंथ म्हणजे एक वसतिस्थानच आहे. सांख्यवेदांतादि सहाशास्त्रांचे सिद्धांत, या ग्रंथांत प्रसंगपरत्वें मांडले गेले आहेत. **शास्त्रजात**--शास्त्रसमूह. **वसैठ**-वस्तीचें ठिकाण. पहा- " वस्तिवां शेवटीं स्वर्गांचे दारवठे । आंतीत गंधर्वांचे वसैठें ।— नरेंद्र, रु. स्व. २११. रा. हर्षे म्हणतात तसा ' वसैठ ' हा लेखनप्रमाद नाहीं. कारण हा शब्द महानुभावी वाङ्मयांत असाच आला आहे. **ओ. ३१**--**धर्माचें**-महाभारत हें सर्व धर्मांचें माहेरघर आहे. पृथ्वीतील भिन्न भिन्न धर्मांचीं तत्वें त्यांत सांपडतात. **जिव्हार**-अंतःकरण. सज्जनाचें अंतःकरण जसें प्रसन्न असतें, तसा हा ग्रंथ प्रसन्न आहे. किंबहुना व्यासांच्या उदार व प्रसन्न मनाचें हा ग्रंथ म्हणजे प्रतिबिंबच म्हणावयास हरकत नाहीं. **लावण्यरत्नभांडार** शारदेच्या लावण्यरूपी रत्नांचें केवळ भांडारच, असा हा भारतग्रंथ आहे. भारतांत शारदेचा विलास आहे असा भावार्थ. **ओ. ३२**-किंवा हें महाभारत म्हणजे व्यास महर्षींच्या प्रतिभेच्या द्वारां, कथारूपानें आविष्कृत झालेली मूर्तिमंत वाणीच होय. प्रत्यक्ष

वाणीनेंच कथारूपानें येथें अवतार घेतला असा भावार्थ. आपल्या आर्यासप्तशतींत गोवर्धनाचार्यांनीं " वाणी बाणो बभूवेति " असें ज्याप्रमाणें बाणभट्टाबद्दल म्हटलें आहे, तसेंच ज्ञानेश्वरांनीं येथें व्यासांच्या भारताबद्दल प्रशंसेचे उद्गार काढले आहेत. **महामती**-दिव्य प्रतिभेंतून ( सप्तमी ). **भारती**-वाणी, वाग्देवी, सरस्वति. **ओ. ३३**-असा प्रत्यक्ष सरस्वतीचा अवतारच हा ग्रंथ असल्यानें, तो सर्व महाकाव्यांचा राजा व्हावा हें साहजिकच आहे. **ग्रंथु गुरुवतीचा ठा ऊ**-ग्रंथगांभीर्याचें केवळ आश्रयस्थान. ग्रंथाला लागणारें गांभीर्य अथवा गहनता, काय ती या भारतांतच सांपडेल. **गुरुवती**—गहनता, गांभीर्य. पहा— " ऐसें बंदीजनु बोलिला जंव । किन्नरु गरुवतीं राहिला तंव । "– नरेंद्र, रु. स्व. १६३. **पथौनि** इ,—या महाभारत ग्रंथापासूनच रसांना माधुर्याची प्रतिष्ठा प्राप्त झाली. शृंगारादि नवरसांच्या माधुर्याची प्रतिष्ठा, या महाभारत ग्रंथापासूनच वाढली यांत वर्णिलेले नवरसात्मक प्रसंग, पुढील कवींना अनुकरणीय झाल्यामुळें, रसांना या ग्रंथामुळेंच महत्त्व चढलें. **आव**—महत्त्व, प्रतिष्ठा. **ओ. ३४**—त्याप्रमाणेंच आणखी असें पहा कीं, वेदांतशास्त्रविषयक शास्त्रीय परिभाषा या महाभारत ग्रंथापासूनच संपन्न झाली व ब्रह्मज्ञानासारख्या कठिण विषयाच्या विवेचनाला या ग्रंथापासूनच सुश्लिष्टता प्राप्त झाली. **शास्त्रिक**—वेदांतशास्त्रविषयक शब्दसंपत्ति भली ( संपन्न ) झाली. **महाबोध**-ब्रम्हज्ञानाचें विवेचन. महाभारत ग्रंथाच्यापूर्वी शास्त्रीय परिभाषा फारशी रूढ नव्हती, ती जशी या ग्रंथानें रूढ केली, तसेंच वेदांतासारख्या कठिण विषयावरचें विवेचनही इतक्या सुश्लिष्टतेनें करण्याची प्रथा या महाभारत ग्रंथानेंच पाडली. **कोवलिक**-कोवळेपणा, सुश्लिष्टपणा. **दुणावली**-दुप्पट झाली. **पथौनि**—या महाभारत ग्रंथापासून. **ओ. ३५— पथ चातुर्य ६०**— या ग्रंथाच्या वाचनानें शहाण्याला देखील शहाणपण आलें. शहाण्या चतुर माणसाला देखील यांत नवीन असें वाचावयास सांपडलें. **प्रेम ६०**-प्रेमाला देखील येथें अधिक गोडी प्राप्त झाली. या ग्रंथांत प्रेमाचा उत्कर्ष झालेला व सुखाचा देखील भाग्योदय झालेला दिसला. तात्पर्य चातुर्य, प्रेम, व सुख यांचा परमोत्कर्ष महाभारतांत झालेला आहे असा भाव. महाभारताच्या वाचकाला चातुर्य, प्रेम, व सुख उत्कटत्वानें मिळतें असेंच या ओवीचें सार आहे. **सिहाणें**-शाहणें. **पोखलें**-पोसलें, वृद्धिंगत झालें. सिद्ध-

नाथ व माडगांवकर प्रतींत, 'प्रेम' याबद्दल 'प्रमेय' असा पाठ घेतला आहे. पण येथें चातुर्य, सुख अशा भाववाचक विषयांच्या उल्लेखांत, मध्येंच प्रमेयासारख्या शास्त्रीय विषयाचा उल्लेख येणें सयुक्तिक नाहीं हें पाहिल्यास, 'प्रेम' हाच पाठ येथें युक्त दिसतो. **ओ. ३६**--हा ग्रंथ इतका मधुर आहे कीं, माधुर्याची येथें परमावधि झाल्याचें अनुभवास येतें. शृंगाराला यांत एकप्रकारचा रेखींवपणा आला आहे. इतर ग्रंथाप्रमाणें शृंगाररसाचें ओबडधोबड स्वरूप येथें न दिसतां, त्याला संयमाची व रेखींवपणाची जोड येथें मिळाली आहे. तशाच कांहीं उचित गोष्टी या ग्रंथांतूनच रूढ केल्या गेल्या आहेत. उचित किंवा आचरणांत आणण्यास योग्य अशा नवीन गोष्टींना, मान्यतेचें शिक्कामोर्तब महाभारतानेंच केलें, आहे.

**ओ ३७**-येथें कलांना अभिज्ञतेची व पुण्याला प्रतापाची जोड मिळाली आहे. महाभारतांतील कलेवरून धडे **घेऊन** कोणीही कलाभिज्ञ होईल, त्याप्रमाणें पुण्य-कारक गोष्टींचा किंवा सत्कृत्यांचाही विजय झाला आहे, असें महाभारतावरून दिसतें. म्हणूनच अशा ग्रंथाच्या श्रवणानें, हातून सर्पसत्रासारखी घोर हत्या झालेल्या जनमेजय राजाचेंही पाप नष्ट झालें. **आगला**-अधिक. **अवलीला**-सहज. **ओ. ३८**-आणि क्षणभर पाहिलें तर, रंगाला चांगल्या रंगाचें, व गुणांना चांगल्या गुणांचें तेज येथें ( या ग्रंथांत ) अधिकच चढलेलें दिसतें. म्हणजे या ग्रंथांत रंगाना काय किंवा गुणांना काय सात्विकतेचें तेज चढलें आहे. **बीक**-तेज, महत्त्व. पहा— " ते मऱ्हाटे बोल रसिक । वरि दावीन देशियेचें बिक ॥ "-नरेंद्र रु. स्व. ४७. **नावेक**-क्षणभर. **बहुवस**-अधिक, फार. महाभारतांतील अनेक आख्यानोपाख्या-नांत रसांचा उत्कर्ष जसा झाला आहे, तसाच त्यांतील पुण्यश्लोक व्यक्तींचा प्रतापही मोठाच आहे. **ओ. ३९**-सूर्याच्या तेजानें शुभ्र झालेलें त्रैलोक्य जसें उज्वल दिसतें, तसें व्यासांच्या प्रतिभेनें व्यापलेलें अखिल विश्व असेंच शोभतें. व्यासांच्या प्रतिभेला येथें सूर्याच्या तेजाची प्रभावी उपमा दिली आहे. व्यासांच्या प्रतिभेचा संस्कार झालेलें विश्व अधिकच तेजःपुंज दिसतें. व्यासांनीं केलेली सृष्टिवर्णनें अथवा व्यक्तिवर्णनें मुळापेक्षांही अधिक गुणसंपन्न आहेत. कविप्रतिभेनें अलंकृत झालेली कोणतीही वस्तु मुळापेक्षांही उज्जल भासते. **धवललें**-शुभ्र झालेलें. **कवळलें**-व्यापलेलें.

**ओ. ४०**-व्यासांच्या प्रतिभेला आणखी एक उपमा देतात " उत्तम जमिनींत पेरलेलें बी जसें आपल्याआपण वाढतें त्याचप्रमाणें अनेक विषय महाभारतांत सुखानें विस्तार पावले आहेत. व्यासांची प्रतिभा ही सुपीक जमिनीप्रमाणें असल्यानें, तिच्या आवाक्यांत येणारे अनेक विषय सहजासहजीं वाढत जातात. महाभारतांत प्रसंगानुरोधानें अनेक विषयांचे विवेचन आलें आहे, त्याला हें अनुलक्षून आहे. **सुरवाडलें**-सुखी झाले आहेत. पहा— ' तयांचा ठाइ सिध्दींचे सर्ग । नानाविध वसताति भोग । तेणें आधारें देव अनेग । सुरवाडले ॥ २ ।।-नरेंद्र, रु ११. **अर्थजात**--विषयसमूह. **ओ ४१**-" किंवा ज्याप्रमाणें शहरांत राहिले असतां, माणूस अधिक सुसंस्कृत होतो, त्याचप्रमाणें व्यासांच्या वाणीच्या तेजानें सर्व जग शुभ्र होऊन गेले आहे. व्यासांनें प्रतिभासंपन्न वाङ्मय वाचून, वाचक अधिक सुसंस्कृत व चतुर बनतो असा अभिप्राय ज्ञानेश्वरांनीं येथे व्यक्त केला आहे. **नागरां**-शहरी, अतएव चतुर, सुसंस्कृत. **ओ. ४२.**—किंवा वयाच्या प्रथमावस्थेत, तारुण्यांत, स्त्रीच्या शरीरावर सौंदर्याचें एक न्यारेंच तेज जसें चमकतें. **नव्हाली**—अपूर्वता, बहर. **ओ. ४३**-किंवा उद्यानांत जेथे जाईची लता फोफावते, तेथे पहिल्याहून अधिक अशी वनश्रीची खाणच उघडली आहे असें ज्याप्रमाणें भासतें; जाईच्या वेलीनें ज्याप्रमाणें त्या उद्यानाला अधिकच शोभा चढते. **माधवी**-जाईची वेल. **घडे**--प्राप्त होई. **खाणि उघडे**-वनश्रीची खाण उघडते. **आदिलापासौनि**--पूर्वीपेक्षां, मुळापेक्षां. **अपाडें**-अधिक. **ओ. ४४**—किंवा सोन्याचा गोळा तसा पाहिला तर अगदींच सामान्य दिसतो. त्यांत सौंदर्य असें कांहींच नसतें पण त्याच्याच बनविलेल्या दागिन्यांत त्याचें सौंदर्य निश्चितपणें दिसतें. म्हणजे सोन्यावर घडलेल्या संस्कारामुळेंच त्याला सौंदर्य व शोभा येते. **घनीभूत**-पाटल्याच्या स्वरूपांत असलेलें. **निहालितां**--पाहतां. **निवाडु** निर्णय. सोनें अलंकाराच्या स्वरूपांतच आपल्या सौंदर्याचा निर्णय दाखवितें. वरील ४२, ४३ व ४४ ओव्यांत अनुक्रमें स्त्रीवर तारुण्याचा, उद्यानावर जातिलतेचा व सुवर्णावर अलंकाराचा संस्कार झाल्यामुळेंच, त्या प्रत्येकाचें सौंदर्य वृद्धिंगत झाल्याचें सांगितलें आहे, त्याप्रमाणें महाभारतकथा देखील व्यासांच्या वाणीनें अलंकृत झाल्यामुळेंच तिला लोकप्रियता लाभली आहे. **ओ ४५**—" व्यासांच्या वाणीनें अलंकृत झालें म्हणूनच त्याला इष्ट तें महत्व आलें, हें

जाणूनच कीं काय इतिहासानें महाभारताचा आश्रय केला." महाभारत हा इतिहासग्रंथही आहे. पण त्याचें स्वरूप कसेंही असलें, तरी व्यासांच्या वाणीनें, भाषाशैलीनेंच त्याला महत्व प्राप्त झालें आहे. प्रत्येक शास्त्राला महाभारताचा जो आश्रय करावासा वाटतो, तो व्यासांच्या भाषेच्या आकर्षणामुळेंच असा अर्थ. **इतिहासीं**-इतिहासांकडून. **ओ. ४६**-किंवा पुराणें देखील आपणाला मोठी प्रतिष्ठा प्राप्त व्हावी यासाठीं, लहानपणा अंगीं धरून आख्यानरूपानें महाभारताच्या आश्रयाला आलीं. पुराणांतील अनेक आख्यानें महाभारतांत प्रसंगानें आलीं आहेत व महाभारतांत समाविष्ट झाल्यामुळेंच त्यांना प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे यथें ज्ञानेश्वरांनीं अशी उत्प्रेक्षा केली आहे कीं, आपणास मोठेपणा मिळावा यासाठींच जणु काय पुराणांनीं भारताचा आश्रय केला. म्हणजे महाभारतांत जसा इतिहास आहे, तसा पुराणांचाही त्यांत समावेश झाला आहे. असा भाव. **पुरतिये**—पुरत्या, पूर्ण. **सानीव**—लहानपणा, लघुत्व. **भारता आलीं**—भारताप्रत आली, भारतांत मिसळलीं. **ओ. ४७**—म्हणून महाभारतांत नाहीं तें त्रिलोकांत नाहीं असा अनुभव आल्यामुळें, व्यासांनीं सर्व जगत्रय उच्छिष्ट करून टाकलें अशी म्हण पडली. असा विषय नाहीं कीं, जो व्यासांनीं महाभारतांत हाताळला नाहीं. **म्हणिपे**-म्हटलें जातें. ( कर्मकर्तरी ) **ओ. ४८**—अशी ही भारती कथा सुरस, काव्यमय असूनही ती परमार्थाची जन्मभूमि आहे. जिच्यापासून उत्तम काव्य-रसास्वाद मिळूनही, परमेश्वरसाधनरूप अशा चतुर्विध पुरुषार्थांची प्राप्ति होणारी आहे. 'परमार्थ' याचा अर्थ ब्रह्मप्राप्ति असा केल्यास भारती कथा ब्रह्मप्राप्ति करून देणारी अथवा सद्गति देणारी आहे असा अर्थ होईल. **मुनि**—वैशंपायन. जनमेजय राजाच्या पृच्छेवरून वैशंपायन मुनीनें त्याला महाभारत सांगितलें. पद्य—" जनमेजय नृपति पुसे वैशंपायन कथी सविस्तर तें."—मोरोपंत. **ओ. ४९**-अशी ही भारती कथा अद्वितीय, अलौकिक सर्व मंगल व कल्याणकारक गोष्टींचें अधिष्ठान अशी असल्यामुळें, ती तुम्ही ऐका. आता ओ ५० ते ५५ यांमध्यें श्रीमद्भगवद्गीतेचें वर्णन आलें आहे. ज्या भगवद्गीतेचें ज्ञानेश्वरांनीं एवढें व्याख्यान आरंभिलें आहे, तिच्या गौरवार्थ प्रस्ताव म्हणून तिचा उल्लेख येथें सर्वस्वी उचित आहे. **ओ. ५०-भारतकमळपरागु**-महाभारतरूपी कमलाचा पराग. गीता महाभारतांतील भीष्मपर्वांत आल्यामुळें, ती भारतांत मध्यवर्ती अशी होऊन राहिली

आहे. कमलाच्या गाभ्यांतच पुष्परज सांठविलेला असतो या न्यायानें, महाभारत-रूपी कमलाचा गाभा असा जो गीतेचा भाग, तेथेंच हे गीतारूप रजःकण असणार हें उघड आहे. शिवाय गीतेचें तत्त्वज्ञान इतकें लोकप्रिय आहे कीं, त्याचा सुगंध सर्वत्र दरवळून राहिला आहे. **पराग**-पुष्परज. **गीताख्य इ०**-गीतेचा विषय असा आहे कीं, जो सांगतांना प्रत्यक्ष श्रीकृष्णाचा अर्जुनाबरोबर संवाद घडला. हा प्रसंग कृष्णार्जुनसंवादाचा म्हणजे अगदीं जिव्हाळ्याचा आहे. प्रत्यक्ष परमेश्वरानें आपल्या भक्ताशीं केलेला हा संवाद आहे. **ओ. ५१**-अशा ग्रंथाचें वर्णन करतांना ज्ञानेश्वरांना काव्यकल्पनेच्या उर्मी न येणें शक्य कसें? म्हणून ते म्हणतात, ' ही भगवद्गीता म्हणजे व्यासांच्या प्रतिभेनें शब्दब्रह्मरूपी समुद्र घुसळून काढलेलें निरंतरचें नवनीत, लोणी आहे " देवदानवांनीं मागें क्षीर-समुद्रमंथन करून जशीं १४ रत्नें काढलीं, तसेंच येथे व्यासांनीं आपल्या प्रतिभेनें वेदांचें मंथन करून गीतारूपी नवनीत बाहेर काढलें. **शब्दब्रह्माब्धि**-वेदरूपी समुद्र. **निरवधि**-निरंतर. **निवडलें**-एकीकडे काढलें. **ओ. ५२**-" मग तेंच लोणी ज्ञानरूपी अग्नीची आंच लावून सारासार विचारानें अथवा काळजीनें कढविलें, तेव्हां त्याला शेवटीं सुवासिक तुपाचें स्वरूप प्राप्त झालें. " **ज्ञानाग्नि**—आत्मापरमात्म्यैक्याच्या ज्ञानरूपी अग्नीनें. **कढसिलें**—कढसणें=कढविणें, अग्निशोधन करणें. पहा—' ज्ञानाग्निहुताशीं कढशिलें वोजा । आत्मसिद्धी काजा लागूनियां ।—तुकाराम. ३९५८. **विवेकें**—आत्मनात्मविचारानें. गीतेचा विषय वेदान्ताच्या अभ्यासाची व विवेकाची जोड देऊन वाचल्यास तेथे विशेषच गोडी येणार हे उघड आहे. लोणी कढविलें असतां त्याचें साजुक तुपांत रूपांतर होतें. तद्वतच गीतेचा अभ्यास ज्ञानपूर्वक विवेकबुद्धीनें केल्यास वाचकाला ब्रह्म-साक्षात्कार होण्यास वेळ लागणार नाहीं असा भाव. **पद आलें इ.**- परिणामीं तें लोणी आमोदाच्या अथवा सुवासाच्या स्थितीला प्राप्त होतें **ओ. ५३**- असें हें लोणकढ तूप, विरक्तांकडूनही इच्छिलें जातें, संतांकडून अनुभविलें जातें, व मुक्त झालेले पुरुष देखील सोहंभावानें त्यांत रममाण होतात. संसाराबद्दल विरक्त झालेल्यांना देखील गीतेच्या तत्त्वज्ञानांत गोडी वाटते. कारण संन्यासोत्तर काय करावें याचा त्यांना तेथे उलगडा होतो. संतांना, भक्तिमार्गी लोकांना तर येथें भगवद्भक्तीचा अनुभव मिळतो. गीतेंत ९ ते १२ अध्यायापर्यंत भक्तीचें विवेचन

आलें असल्यानें, भक्तांनाही गीतेच्या तत्त्वज्ञानांत स्वानुभव मिळतो. शिवाय जे पारंगत म्हणजे संसारसागर तरून गेले आहेत, अशा जीवन्मुक्तांना देखील ' सोऽह-मस्मि ' चा अथवा आत्मापरमात्म्यैक्याचा साक्षात्कार तेथे घडत असल्यानें त्यांचीं मनें देखील भगवद्गीतेच्या तत्त्वज्ञानांत रममाण होतात. सारांश गीतेंत संन्यास, भक्ति, ज्ञान, कर्म इत्यादि सर्वच विषयांचें विवेचन आलें असल्यानें, सर्व प्रकारच्या उपासकांचा अथवा साधकांचा तो एक विसाव्याचा ग्रंथ होऊन बसला आहे.

ओ. ५४- अशी ही गीता, जी सर्वांहूनच भक्तीनें पूजली जाते, जी त्रिजगतांत म्हणजे सर्वत्र वंदनीय ठरली आहे, ती भीष्मपर्वांत आलेली अशी आतां सांगितली जाईल. **भीष्मपर्वी संगति**—भीष्मपर्वांतर्गत. भीष्मपर्वा-बरोबर आलेली. **ओ. ५५**- आतां भगवद्गीतेच्या अभ्यासाची प्राचीन परंपरा सांगतात. " ही भगवद्गीता म्हणजे अशी आहे कीं, जिची ब्रह्मदेव व शंकर यांनीं प्रशंसा केली असून, जिचा सनकादिक मुनींनीं देखील मोठ्या आदरानें अभ्यास केला आहे. " **सनक**—सनक, सनंदन, सनत्सुजात व सनत्कुमार हे ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र आहेत. यापुढें **५६-६२**. ओव्यांत गीतेचें हें तत्त्वज्ञान श्रोत्यांनीं किती हळुवारपणानें ऐकलें पाहिजे, त्याचें वर्णन ज्ञानेश्वर फारच काव्यमयतेनें करतात. ते श्रोत्यांपासून जी हळुवार वृत्ति अपेक्षितात, तीच त्यांचीही नेहमीची वृत्ति असल्याशिवाय त्यांच्या तोंडून असे कोमल उद्गार सहजीं बाहेर पडणार नाहींत. ज्ञानेश्वरांचें कोमल व भावनाप्रधान मनच या ओव्यांतून व्यक्त झालें आहे. **ओ. ५६**—शरद् ऋतूंतील अष्टमीपर्यंतचे चांदण्यांतून पाझरणारे कोवळे अमृतकण, चकोराचीं पिलें ज्या हळुवार वृत्तीनें टिपतात, त्याच हळुवार वृत्तीनें श्रोत्यांनीं हा गीतेचा विषय प्राशन केला पाहिजे, असा भाव. शरद्ऋतूंत चांदणें स्वच्छ व निरभ्र असून अशा चांदण्यांतून अमृताचा पाझर होतो व अशा अमृत-स्रावी किरणांवरच चकोरपक्षी जगतात अशी कविकल्पना आहे. अगोदर चांदणें, त्यांतूनही तें शरद्ऋतूंतलें, व अशा अमृतस्रावी चांदण्याचा आस्वाद चकोराच्या पिलांनीं हळुवार मनानें घेणें, म्हणजे प्रशांत वृत्तीची कमालच म्हटली पाहिजे. येथें विषय जितका काव्यमय व हृदयंगम तितकेच त्याचा आस्वाद घेणारे देखील रसिक व संयमशील असतात असा सांगण्याचा हेतु आहे. भगवद्गीतेच्या तत्त्वज्ञानाचा विषय देखील शरद् ऋतूंतील चांदण्याप्रमाणें साधकांना आल्हाददायक असून, तो त्यानें अती-

शय मवाळ मनानें व प्रशांत वृत्तीनें सेवन केलें पाहिजे. चकोर जसा चंद्रकिरणा-वरच जगतो, तद्वतच साधकानें देखील गीतेच्या तत्वज्ञानावर तितक्याच उत्कट-त्वानें विसंबावें असें येथें सूचित करण्यांत आलें आहे. शरदृतूंतील चांदण्याचें कोंवळें अमृतकण व तेही मोठ्या चकोर पक्ष्यांनीं नव्हे, तर त्यांच्या पिलांनीं वेचले असें म्हणण्यांत देखील, लहान पिलांचा दाणे टिपण्याचा हळुवारपणाच ज्ञानेश्वरांनीं येथें ध्वनित केला आहे. **मौआलें**—मऊ, हळुवार अशा मनानें. येथे विशेष्य अशा मनाची जी तृतीया विभक्ति, तीच 'मवाळें' या विशेषणाची ठेवली आहे. यादवकालीन भाषेचा हा एक विशेष आहे. **तलगें**—पिलें. **ओ. ५७**–" वर चकोरपिलांचा दृष्टांत दिल्याप्रमाणें श्रोत्यांनीं आपल्या मनाच्या हळुवारपणानें हा गीतेचा विषय अनुभवावा, " असें ज्ञानेश्वरांचें सांगणें. **श्रोतां**-श्रोत्यांनीं (तृ.)

**ओ. ५८**—हळुवारपणा का पत्करावयाचा याचें कारण या ओंवींत सांग-तात. हा गीतेच्या तत्त्वज्ञानाचा विषय असा आहे कीं त्याच्या विवेचनाला शब्दांची जरूरच नाहीं. तो प्रत्येकानें आपापल्या अंतःकरणानेंच जाणून घ्यावयाचा आहे. हा विषय हृदयगम्य असल्यानें कोणत्याच इंद्रियांची मदत न घेतां त्याचा आस्वाद घेता येतो. ज्याचें मन ब्रह्मसाक्षात्काराला तयार झालें आहे, ज्याची वर सांगितल्याप्रमाणें प्रशांत वृत्ति होऊन एकतानता झाली आहे, अशांना या गीतेच्या तत्त्वज्ञानाचे सिद्धांत, विवेचनाच्या आधींच कळून चुकतात. **संवादिजे**—बोलली जाते. या गीतातत्त्वज्ञानाची भाषा हृदयगम्य असल्यामुळें, शब्दांचें तेथे कामच नाहीं. इतर इंद्रियांना हा विषय कळण्यापूर्वींच मन केव्हांच असा विषय भोगून आस्वादून गेलेलें असतें. म्हणून अशा विषयाचें शब्दांनीं विवेचन करण्या-पूर्वींच त्यांतील सिद्धांत मनाला येऊन चिकटलेलें असतात. **झोंबिजे**—लगटले जातात. **ओ. ५९**—हा गीताग्रंथ जाणून घेण्याचा प्रकार किती हलक्या हातानें व सफाईदारपणानें केला पाहिजे, तें भ्रमर—कमलदलांच्या दृष्टांतानें स्पष्ट करतात. ' भ्रमर कमलांतील पराग नेतात, पण तो नेल्याची कमलदलांना मुळी जाणीव सुद्धां न व्हावी, इतक्या सफाईदारपणानें आपलें कार्य ते उरकतात. हा ग्रंथ सेवन करतांना श्रोत्यांनीं देखील असाच अगदीं मृदु प्रकार अवलंबिला पाहिजे. किंबहुना हा ग्रंथ जाणण्याची तीच एक रीत आहे, असा ज्ञानेश्वरांचा अभिप्राय

आहे. ज्ञानेश्वरांनीं येथे दिलेला हा भ्रमर—कमलदलांचा दृष्टांत जितका उचित, तितकाच तो काव्यमय आहे. श्रोत्यांनीं गीतेचें सेवन भ्रमरांच्या हलुवार प्रकारानेंच करावें, असें येथे सुचविण्यांत आलें आहे. **सेविती परी**—सेवन करण्याची, आस्वाद घेण्याची रीत, प्रकार. येथे देखील विशेष्याप्रमाणेंच विशेषणाचें स्त्रीलिंग ठेवण्याची तत्कालीन भाषेची लकब लक्षांत ठेवण्यासारखी आहे. **ओ. ६०**--या ओवींतील चंद्र-कुमुदिनीचा दृष्टांत देखील असाच हृदयंगम व अचूक आहे. " चंद्रविकासी कमलिनी ज्याप्रमाणें आपले स्थान न सोडतां, चंद्र उदय पावतांच त्याच्या प्रेमाचा उपभोग कसा घ्यावयाचा हें जाणते." चंद्र उगवतांच कुमुदिनी विकासित होते. त्याला आलिंगून मोकळी होते. पण हे सर्व करीत असतां, आपलें स्थान सोडून एखाद्या सामान्य प्रेयसीप्रमाणें ती खळखळ करीत नाहीं. चंद्राच्या प्रेमाचा उपभोग ती आपल्या जागेवरूनच प्रशांतपणें घेते. यांतच तिची उत्कटता व सात्त्विकता व्यक्त होते. श्रोत्यांनीं देखील या कुमुदिनिच्या तन्मय वृत्तीचें अनुकरण करून प्रस्तुत गीताविषयाचें स्थिरवृत्तीनें सेवन करावें, असा भाव. चंद्र—कुमुदिनीच्या या दृष्टांतानें ज्ञानेश्वरांनीं श्रोत्याच्या पवित्र, उत्कट, अव्यभिचारी व प्रशांत वृत्तीची अपेक्षा ध्वनित केली आहे.

ओ. ६१—' अशा गंभीर व स्थिरवृत्तीनें युक्त असा जो असेल, तोच या गीताग्रंथांतील विषय जाणूं शकेल." **थिरावलेनि** - स्थिरावलेल्या, एकनिष्ठ **अंतष्करणें आथिला**—अंतःकरणानें युक्त. ज्याचें मन वर सांगितल्याप्रमाणे भ्रमराप्रमाणें पेलव व कुमुदिनीप्रमाणें सुस्थिर व अव्यभिचारी आहे, ज्याला या गीताविषयाबद्दल इतकी आस्था आहे, तोच हा विषय जाणेल. **मातु**—गोष्ट. **ओ. ६२**—या ओवींत ज्ञानेश्वर श्रोत्यांना अवधान देण्याची विनंति करतात. " अर्जुनाच्या पंक्तिला बसून गीताप्रवचन ऐकण्याची ज्यांची योग्यता आहे. अशा अधिकाराच्या श्रोत्यांनीं माझ्या व्याख्यानाकडे लक्ष द्यावें." ज्ञानेश्वरांनी येथे आपल्या श्रोत्यांना अर्जुनाच्या पंक्तीला बसण्याच्या योग्यतेचे, असें म्हणून त्यांची प्रशंसाच केली. श्रीकृष्णांनीं सांगितलेली गीता ऐकण्याचा ज्याचा अधिकार, त्या अर्जुनाच्या पंक्तीला बसण्याइ योग्य होणें हा मोठाच गौरव होय. अर्जुनाचा अधिकार फार मोठा. म्हणून श्रोत्यांना बहुमान देतांना मुद्दाम त्याच्या योग्यतेचे असें संबोधलें आहे. **परिसणेयां**—ऐकण्या. संताच्या अवधानाची ज्ञानेश्वरांनि

आपल्या ग्रंथांत प्रत्येक अध्यायाच्यावेळीं अशीच प्रार्थना केली आहे. **ओ. ६३--** ज्ञानेश्वर पुढें श्रोत्यांना म्हणतात. " माझ्या व्याख्यानाकडे लक्ष द्या असें मी सलगीनें म्हटलें व आपल्या पायां पडून मी आपणास विनंति केली. कारण आपलें अंतःकरण तसें गंभीर आहे. **सखोल**— फार खोल, गंभीर. ओ. ६२ पासून ८२ पर्यंतचा भाग श्रोत्यांनाच अनुलक्षून आहे. **ओ. ६४—६५** " आपलें मूल जरी बोबडें बोललें, तरी त्याचा आनंदच मानणें हा जसा आईबापांचा स्वभाव असतो, तद्वतच तुम्हां सज्जनांनीं माझा अंगिकार ज्या अर्थी केला आहे व ज्या अर्थी मला आपला म्हटलें आहे, त्याअर्थी माझ्यांत असणारा कमीपणा तुम्हीं सहजच सहन केला आहे. मग आणखी प्रार्थना ती काय करायची ? येथे ज्ञानेश्वरांनीं आपल्या श्रोत्यांना आईबाप व आपणास अपत्य असें पर्यायानें संबोधून आपला विनय प्रकट केला आहे. श्रोत्यांनीं आपणास आपला म्हटले आहे व आपला अंगिकार केला आहे, त्याअर्थी ते आपल्या व्याख्यानांतील न्यून्य अगर दोष सहजच सहन करतील अशी आत्मविश्वासपूर्वक अपेक्षा त्यांनीं व्यक्त केली आहे. **संतोखु**— संतोष, आनंद. **आथि**— अस्ति, होतो. **उणावो**—उणीव, न्यून. **उपसाहणें**—क्षमा करणें, सहन करणें. ज्ञानेश्वरांनीं नवव्या अध्यायांतही असाच बालकाच्या बोबड्या बोलाचा व मातेचा दृष्टांत दिला आहे. पहा– " आणि बालक बोबडां बोलीं । कां वांकुडा विचुकीं पाउलीं । चोज करूनि माउली रिझवी जेवि ॥ ६ ॥ शिवाय ६४ ओवींत श्रोत्यांच्या सलगीचा जो त्यांनीं उल्लेख केला आहे, तसाच पुनः नवव्या अध्यायांतही करण्यांत आला आहे. पहा– " आणि एथ ही सलगि करूं जरि बीहों । तरि निवों के पां ॥ ५ ॥ यावरून श्रोत्यांना मोठेपणा देण्याची ज्ञानेश्वरांची पद्धति नेहमीचीच दिसते.

**ओ. ६६** – पण ज्ञानेश्वर म्हणतात कीं, " आपल्या सलगीचा फायदा घेणें एवढाच अपराध माझ्या हातून घडला नसून याहूनही अधिक अपराध माझ्याकडून असा झाला आहे कीं, मी गीतार्थ करण्याचें धाडस करून तो पुनः ऐका म्हणून आपणाला विनंति करतो आहे. " अगोदर गीतार्थाला हात घालणें हें पहिलें धाडस व पुनः तो तुमच्यासारख्या अधिकारी श्रोत्यांना ऐका म्हणणें हें तर त्यातूनही धाष्टर्याचें कृत्य होय. आपल्यासारख्यानें गीताव्याख्यानाचा उपक्रम करावा हें ज्ञानेश्वरांना धाडसाचें वाटावें, यांतच त्यांची विनयवृत्ति दिसून येते. **कलूं**–**आकलूं**–

आकलन करूं पाहत आहे. **ते अवधारा** इ.—व तें गीताव्याख्यान ऐका म्हणून विनंति करण्याची मी इच्छा धरतो हा माझा अपराध आहे. **ओ. ६७**—याचा विचार करूं लागलें असतां, असें दिसतें कीं, माझी गीताव्याख्यान करण्याची इच्छा अगदीं आवरेनाशी झाली आहे, व उगीचच माझ्या मनांत धैर्य उत्पन्न झालें आहे. नाहीं तर सूर्य प्रकाशांपुढें एकाद्या काजव्याला कितपत शोभा प्राप्त होणार !" गीताव्याख्यान करण्याची आपली अनावर हौस व एक प्रकारचा आत्मविश्वास येथें आपल्या उपक्रमास प्रेरक झाला, असें ज्ञानेश्वर सांगतात. सूर्याच्या तेजापुढें काजव्यानें मिरवणें शोभणार नाहीं हें खरें. पण तोही तसें मिरविण्याचें जें धाडस करतो तें त्याच्या अंगांतील आत्मविश्वासामुळेंच, असें ज्ञानेश्वरांना येथें सूचित करावयाचें आहे. आपल्या अनावर हौसेमुळें व धैर्यामुळेंच आपल्यासारख्या तेजस्वी श्रोत्यापुढें व्याख्यान करण्याचें आपणास धाडस करतां आलें, असा ज्ञानेश्वरांच्या म्हणण्याचा आशय आहे. **विचारतां**-विचार करतां. **धिंवसा**-धैर्य. **उपनला**-उपजला, उत्पन्न झाला. **खद्योत**— काजवा. **ओ. ६८** आपण गीताप्रवचनास कसे प्रवृत्त झालों ते आणखी दृष्टांतानें सांगतात. " किंवा टिटवीनें आपल्या चोंचीनें समुद्रांत पाण्याचें माप टाकावें, त्याप्रमाणें मी अज्ञानी या गीताप्रवचनाला प्रवृत्त होत आहे. टिटवी सारख्या लहान पक्ष्यानें आपल्या इवल्याशा चोंचीनें पाणी आणून समुद्रांत भर घालण्याचा प्रयत्न करावा, तसेंच माझें हें गीताप्रवचनाचें अज्ञानी कृत्य आहे. गीताशास्त्र केवढें समुद्रासारखें अफाट व गहन व त्यांत माझ्या व्याख्यानानें मी भर घालूं पाहणें अजाणपणाचेंच आहे. येथें टिटवी व समुद्र यांच्या सुप्रसिध्द, कथेचा ज्ञानेश्वरांना उल्लेख करावयाचा आहे, असें कांहीं टीकाकारक म्हणतात. पण त्या कथेंत ती टिटवी आपल्या मुलांना समुद्राबाहेर काढण्यासाठीं आपल्या चोंचीनें समुद्राचें पाणी बाहेर उपसीत होती असा प्रसंग आहे. येथें तर टिटवीसारख्या क्षुद्र पक्ष्यानें आपल्या चोंचीनें समुद्राच्या पाण्यांत भर घालणें असें हास्यास्पद, तसेंच आपण गीतेसारख्या गंभीर ग्रंथांत आपल्या ज्ञानाची भर घालणें हें अज्ञानपणाचें आहे, असें ज्ञानेश्वरांना स्पष्ट करावयाचें आहे. म्हणून वरील सुप्रसिद्ध कथेचे अनुसंधान येथें असेलच असें म्हणवत नाही. **टिटिभु**— टिटवी. आहे. असा ध्वनि. **अनुवादणें**-सांगणें. **ओ. ७३**- " असें हें गीताशास्त्र अत्यंत सखोल असून, जेथे वेदांचीही अक्कल गुंग होते, तिथं माझ्यासारखा

अर्थ करतात. पण 'वेडावणें' = वेडे होणें या अर्थी जुन्या वाङ्मयांत हा शब्द वापरलेला आढळतो. पहा—'वेडावती वेद मगरस्न जेथें'—सामराज, रु. ह. **अल्प**--क्षुद्र असा मी. गीताशास्त्राच्या महनीयत्वापुढें ज्ञानेश्वरांनी आपल्या बुद्धीची असमर्थता येथे मोठ्या विनयानें व्यक्त केली आहे. **ओ. ७४**--हे गीताशास्त्र कसें कह्यांत आणावें ! या गीताशास्त्ररूपी महातेजालाच प्रकाशित करण्याचा उपद्याप कोणी करावा ! एकाद्या घुंघरट्यानें सर्व आकाश कसें बरें मुठींत धरावें ! ज्ञानेश्वर येथे गीताशास्त्रप्रतिपादनाची आपली असहायता स्पष्ट करीत आहेत. हे गीता-शास्त्र इतकें अफाट आहे कीं, तें आपल्यासारख्या लहानांना कसें कह्यांत धरतां येईल ? सूर्यासारख्या महातेजाला कोण प्रकाशित करणार ? त्याप्रमाणें या तेजस्वी गीतातत्त्वज्ञानावर व्याख्यान करून त्याला नवीन उजाळा तो कोण कसा देणार ? घुंघुरट्यानें आकाश आपल्या मुठींत धरणें ही कल्पनाच जशी हास्यास्पद, तसें आपल्यासारख्या क्षुद्र माणसानें गीतेवर व्याख्यान करणें ही एक अशक्यप्राय गोष्ट आहे. **ढवळावें**— प्रकाशित करणें, किंवा घुसळावें असाही अर्थ होइल. तसा अर्थ घेतल्यास या महातेजाला घुसळुन काढण्यास कोणी धजावें ? महातेजाला स्पर्श करणें जेथे मुष्किल तेथे घुसळण्याचें धारिष्ट कोण करील ? **मशक**— घुंगुरटें. **ओ. ७५**-पण ही अशक्य गोष्ट आपण आपल्या गुरूंच्या आधारावर करीत आहों, असें ज्ञानदेव येथे सांगतात. "पण मला अनुकूल असणारा श्रीगुरु निवृत्तिनाथ हाच माझा एकमेव आधार असून, त्याच आधारावर मी सधैर्य होऊन बोलत आहे." **सधर**—सधैर्य. आपल्या गुरूंच्या पाठिंब्यावर विसंबून आपण गीताव्याख्या-नाचें हें दुर्घट कार्य करीत आहे, असें ज्ञानदेवाचें म्हणणें. येथें ज्ञानदेवाची गुरुभक्ति व आदर व्यक्त झाला आहे. **ओ. ७६**--"आतां एरव्हीं मुळांतच जरी मी मूर्ख असलो व गीताव्याख्यान आरंभण्याचा अविचार जरी माझ्याकडून झाला असला, तरी सज्जनांच्या कृपेचा दीप मला माझ्या कार्यांत मार्गदर्शक होणारा आहे." ज्ञानेश्वर आपण अज्ञानी असल्याचें प्रांजलपणानें सांगून संतकृपेवरच आपण विसंबून असल्याचें स्पष्ट करतात. हें गीताव्याख्यान आरं-भण्यांत अनधिकारानें जरी आपल्या हातून अविचार घडला आहे, तरी त्यांत होणाऱ्या चुका संतांनीं, क्षमा कराव्या अशीच ज्ञानेश्वरांची अपेक्षा आहे. **यरव्ही**

एरवीं. **संतकृपादीपकु**-सज्जन श्रोत्यांच्या कृपेचा दिवा. सज्जनांची क्षमाशील वृत्तीच येथें ग्रंथकाराला प्रोत्साहक होणार असल्यामुळें, तिला मार्गदर्शक अथवा पुढील कार्याचा प्रेरक अशा दिव्याची उपमा दिली आहे. **सोज्वलु**—सोज्वळ, प्रकाशमान. **ओ. ७७**. यापुढील दोन ओव्यांत संतकृपेचें सामर्थ्य वर्णन केलें आहे. " लोखंडाचें जें सोनें होतें तें सामर्थ्य परिसांतच असतें. किंवा अमृतसिद्धीनेंच मेलेल्या माणसाला पुन: सजीवत्व प्राप्त होतें. परीस ही एक अशी अजब धातु आहे कीं, तिच्या स्पर्शानें लोखंडाचें सोनें होतें. ज्ञानेश्वरांच्या म्हणण्याचा आशय असा कीं, लोखंडाचें सोनें करणें हा जसा परिसाचाच सामर्थ्यशाली गुणधर्म आहे, किंवा मेलेल्याला जिवंत करणें हा जसा अमृतसिद्धीचाच प्रभाव आहे, तसा माझ्याकडून ग्रंथकर्तृत्व होणें, हें सर्वस्वी संतकृपेचेंच सामर्थ्य होय. लोखंड आपणहून कांहीं सोनें होत नाहीं, किंवा मेलेला आपणहून कांहीं जिवंत होत नाहीं तें करण्याचें सामर्थ्य अनुक्रमें परिसांत व अमृतसिद्धींतच आहे. तद्वतच माझ्याकडून केवळ गीताव्याख्यान होणें शक्य नसून तें संतांच्या प्रोत्साहनानें व क्षमाशील वृत्तीनेंच घडून येणार आहे. **अमृतसिद्धी**—अमृतसिद्धीनें, अमृत प्राप्त झाल्यानें. ही तृतीया आहे. **लाहे**—लाभे. **ओ. ७८**—" जर साक्षात् सरस्वति प्रगट होईल, तर मुक्या माणसाला देखलि वाचा फुटेल. हा त्या त्या वस्तूच्या सामर्थ्याचा प्रभाव आहे. यांत आश्चर्य तें काय ? " सरस्वति ही वाणीची अधिष्ठात्री देवता असल्यानें, ती प्रत्यक्ष प्रगट होऊन कृपा करील तर मुक्या माणसाला देखील बोलतां येईल. म्हणून हा असा चमत्कार करण्याची शक्ति त्या त्या वस्तूंत असतेच. परिसांत लोखंडाचें सोनें करण्याची, अमृतांत मृताला जिवंत करण्याची व सरस्वतींत मुक्याला वाचाळ करण्याची शक्ति आहेच. त्यांत आश्चर्य तें काय ? ज्ञानेश्वरांचा आशय असा कीं, या वर सांगितलेल्या वस्तूंत जसें हें सामर्थ्य आहे, तसेंच आपणाकडून व्याख्यान करविण्याचें सामर्थ्य संतकृपेंतच आहे. त्यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे ? **सिद्ध**-साक्षात्, प्रत्यक्ष. **आथि भारती**—वाणी प्राप्त होईल, वाचा फुटेल. " मूकं करोति वाचालं पंगुं लघयते गिरिम् । यत्कृपा तमहं वंदे परमानंदमाधवम् "– हा गीतेंतील श्लोक येथे समानार्थसूचक आहे. **ओ. ७९**—यापुढें सज्जन श्रोत्यांना आणखी कामधेनूची उपमा दिली आहे. " ज्याला कामधेनूसारखी आई आहे,

त्याला या जगांत अप्राप्य असें काय आहे ? हें जाणूनच मी हा ग्रंथ रचण्यास प्रवृत्त झालों आहे. " कामधेनु ही इच्छित वस्तु देणारी गाय आहे. अशी आई ज्याला लाभली आहे, त्याला न मिळण्यासारखी वस्तु जगांत असणेंच शक्य नाहीं. कामधेनु व त्यांतूनही ती आई म्हणून लाभणं, हें एकाहून एक विशेषाचें लक्षण होय. असा इच्छित वस्तु देणाऱ्या आईचा लाभ झाल्यानंतर त्या मुलाला कोणती वस्तु दुर्मिळ राहील ? संत हे असेच कामधेनूप्रमाणें असल्यानें व त्यांतूनही पुनः ते आपणास आईच्या ठिकाणीं असल्यानें, मग ग्रंथकर्तृत्वासारखी गोष्ट आपणास दुर्घट कशी असणार ? व या त्यांच्या आधारावरच आपण हें गीताव्याख्यानाचें कार्य शिरावर घेतलें आहे, असा आपल्या ग्रंथकर्तृत्वामागील संतकृपेचा पाठिंबा, ज्ञानेश्वर मोठ्या प्रेमानें व्यक्त करतात. ८०—८२ या ओव्यांत अशाच संतश्रोत्यांना विनंति केली आहे. " तर आतां या व्याख्यानांत जें कमी पडेल तें पूर्ण करून घ्या, व जे कांहीं मुळापेक्षां अधिक येईल तें मान्य करून घ्या, असें मी तुम्हांला विनविलें आहे. " गीतेवर टीका करतांना अथवा मुळाचें स्पष्टीकरण करतांना जर कांहीं कमी पडलें, तर श्रोत्यांनीं आपल्या कल्पनाशक्तीनें तें पूर्ण करून घ्यावें व जर कांहीं ग्रंथविस्तार झाला, मुळापेक्षांही कांहीं अधिक मजकूर आला, तर तो त्यानीं मान्य करून घ्यावा, अशी ज्ञानेश्वरांची येथें विनंति आहे. **पुरतें करणें**—पूर्ण करणें. **सरतें करणें**—मान्य करणें. पहा—' तुका म्हणे माती । केली कस्तूरीनें सरती '—तुकाराम. " तेणें गुरुप्रसादें सरता जाला । स्थानीं रायाचिये ॥ १५७ ॥ "—नरेंद्र—रु. स्व. जुन्या वाङ्मयांत ' सरतें ' याचा हा विशिष्ट अर्थ असल्यानें, ' वाचून संपवून टाका " हा रा. हर्ष्यांनीं केलेला अर्थ अग्राह्य आहे.

**ओ. ८३**—" म्हणून आतां माझ्या व्याख्यानाकडे लक्ष द्या. कारण एकादें लाकडी कळसूत्री बाहुलें जसें दोरी ओढणारा हालवलि त्याप्रमाणें हालचाल करतें, त्याप्रमाणें तुम्हीं बोलविलें तरच मी बोलेन. " कळसूत्री बाहुल्याची सर्व हालचाल जशी त्या दोरी हालविणाऱ्याच्या हातांत असते, तसेंच हें व्याख्यान करण्यास तुम्हीं प्रोत्साहन द्याल तरच माझ्याकडून तें होईल, असा ज्ञानेश्वरांचा

आशय. कळसूत्री बाहुल्याची सर्व शक्ति जशी सूत्रधाराधीन, तशी माझी व्याख्यान करण्याची शक्ति तुमच्या आधीन आहे, अशी ते आपली असहायता अत्यंत प्रांजळपणानें श्रोत्यांना मांठेपणा देऊन स्पष्ट करतात. माझें बोलणें, माझें व्याख्यान सर्वस्वी तुमच्या प्रोत्साहनावर अवलंबून आहे असा अर्थ. तुकाराम जसें ' बोलविता धनी वेगळाची ' असें म्हणून आपल्या अभंगवाणीचें सर्व श्रेय ईश्वराला देतात, तद्वतच ज्ञानेश्वरांनीहीं येथें आपल्या व्याख्यानाचें सर्व श्रेय श्रोत्यांना दिलें आहे. **बोलविलां**—तुम्हीं बोलविलें असतां, तुम्हीं बोलविलें तर, बोलावयास लाविलें तर. **दारुयंत्र**—लाकडाचें बाहुलें, कळसूत्री बाहुलें. **चेष्टे**—हालचाल करतें. **सूत्राधीन**—दोऱ्याच्या हालचालीवर अवलंबून असणारें. ज्ञानेश्वरांच्या कालीं कळसूत्री बाहुल्यांचा खेळ रूढ असावा असें यावरून दिसतें. **ओ. ८२**—" त्या कळसूत्री बाहुल्यप्रमाणें मी तुमची कृपा घडलेला, तुम्हां साधूंचा सेवक, आपणच अलंकार घातलेला, अत्यंत भूषविलेला असा मी आहे. " ज्ञानेश्वर येथें आपण सर्वस्वी श्रोत्यांच्या आधीन असल्याचें सांगतात. **अनुगृहीत**—श्रोत्यांची कृपा ज्याच्यावर झाली आहे असा. **निरोपितु**—निरोप्या, निरोप सांगणारा, सेवक. **अलंकरितु**-अलंकृत, आपल्या कृपेनें अलंकृत झालेला, आपण नटविलेला, आपण चांगला म्हटलेला. **भलतैसा**—वाटेल तसा, अत्यंत. याचा संबंध ' अलंकरितु ' यांकडे घ्यावा, म्हणजे त्याचा क्रियाविशेषणासारखा अर्थ होईल.

**ओ. ८३**—ज्ञानेश्वरांनीं गुरूचा केलेला गौरव, श्रोत्यांच्या कृपेची वर्णिलेली महति इत्यादि प्रस्तावना ऐकून, तेथें व्याख्यानाला हजर असणारे ज्ञानेश्वरांचे गुरु निवृत्तिनाथ जणु त्यांना म्हणाले, " आता ही प्रस्तावना थांबव, आतां तुला याबद्दल बोलण्याचें कांहीं कारण नाहीं. या बोलण्यांत वेळ न घालविता ग्रंथाकडे, गीता व्याख्यानाकडे लवकर लक्ष दे. " निवृत्तिनाथांनीं आपणास वेळींच भानावर आणून ग्रंथप्रारंभाची सूचना दिली, असें ज्ञानेश्वरांनीं आपल्या ग्रंथाच्या प्रत्येक अध्यायांत सांगितलें आहे. असें पर्यायानें सांगण्यांत, आपणास ग्रंथ विस्ताराची जाणीव असल्याचें त्यांनीं जसें भासविलें आहे, तसेंच आपणास आपल्या ग्रंथकर्तृत्वास आपल्या गुरूंची अनुज्ञा झाल्याचेंही त्यांनीं जाहीर करून टाकलें आहे. **ओ. ८४**-अशा या गुरूंच्या अनुज्ञेनें निवृत्तिदास ज्ञानेश्वरांना परम संतोष वाटून, " आतां

लक्ष देऊन माझें व्याख्यान ऐका" असे ते श्रोत्यांना म्हणाले. गुरूंची अनुज्ञा मिळाल्यामुळें, ज्ञानदेवांना परमाल्हाद वाटला. आपल्या कार्यामागें गुरूंची अनुमति आहे, आतां आपणास भिण्याचें कारण नाहीं, शिवाय कमीअधिक पाहण्यास ते श्रोतृवृंदांत आहेतच, हे पाहून ज्ञानेश्वरांच्या मनाला मोठाच आधार वाटला असला पाहिजे, व त्याचाच आनंद येथें त्यांनीं व्यक्त केला आहे. **म ा अवकाश देऊन**—शांतपणानें. सावकाशपणें असें आजही आपण म्हणतोंच. येथें पहिल्या अध्यायाची प्रस्तावना संपली असून, गीताव्याख्यानाला यापुढें सुरवात होते. भारतीय युद्धासाठीं कौरवपांडव कुरुक्षेत्रावर जमले असतां, त्यांनीं प्रत्यहीं काय काय केलें याची बारीकसारीक हकीकत, अंधळ्या धृतराष्ट्राला सांगण्याचें काम संजयाकडे होतें. प्रत्यक्ष रणांगणावर न जातां तेथून लांब अशा हस्तिनापुरांत बसून, कौरव पांडवांची हालचाल पाहण्याची दिव्यदृष्टि संजयाला लाभली असल्यानें, अंधळ्या धृतराष्ट्राला बसल्याठिकाणीं युद्धाची सर्व बातमी कळण्याची सोय झाली होती. म्हणूनच गीतेच्या पहिल्या श्लोकांत तो संजयाला कौरवपांडवांच्या हालचालीचा प्रश्न विचारीत आहे. गीतेचा प्रारंभ, धृतराष्ट्र—संजयांच्या प्रश्नोत्तरानें होत आहे हें या दृष्टीनें अत्यंत औचित्यपूर्ण असून, तो परिणामकारही झाला आहे. ज्ञानेश्वर यापुढें गीतेच्या प्रत्येक श्लोकावर स्पष्टीकरण करणार असून, त्यांचें टीकाकार म्हणून विशिष्ट धोरणही आपणास यापुढें दिसणार आहे. त्यांनीं आपल्या गीताटीकेला 'भावार्थदीपिका' हें अर्थपूर्ण नांव ज्याअर्थी दिलें आहे, त्याअर्थी गीतेचा अर्थ करतांना शाब्दिक कीस न काढतां श्लोकाचा एकंदरानें आशय अथवा भाव काय आहे, तोच उकलून सांगण्याचा त्यांचा रोख आहे. ज्ञानेश्वरांनीं गीतेच्या पदावर स्पष्टीकरण करतांना जो ग्रंथविस्तार केला आहे, मुळापेक्षांही जो अधिक भावार्थ मांडला आहे, त्यांतच त्यांचें कवित्व सांठविलेलें आहे.

(**श्लोक १**)—युध्दाच्या इच्छेनें जमलेले आपले पुत्र व पांडव त्या कुरुक्षेत्रावर काय करते झाले, असा धृतराष्ट्राचा संजयाला साधा प्रश्न आहे. **ओ. ८५**--या ओंवीत धृतराष्ट्राच्या मनःस्थितीचें थोडें वर्णन आहे. तो पुत्रस्नेहानें मोहित झाला होता व म्हणून आपल्या पुत्रांचें कांहीं बरें वाईट तर झालें नाहींना अशा बुद्धीनें तो संजयाला कुरुक्षेत्राची बातमी विचारीत होता, हें ज्ञानेश्वरांनीं मूळ श्लोकापेक्षां अधिक असें कथासंदर्भावरून येथें घातलें आहे.

**मातु** – बातमी, हकीकत. **ओ. ८६**—ज्याला धर्मालय असे म्हटलें जातें, तेथें माझे दुर्योधनादिपुत्र व पांडव युद्धाच्या निमित्तानें गेले आहेत, असे येथें म्हणण्यांत धृतराष्ट्र अशा युध्दाला अनुकूल नव्हता, असाच भाव ज्ञानेश्वरांनीं येथे व्यक्त केला आहे. **व्याजें**—निमित्तानें, मिषानें. **जूझाचेनि**-युद्धाच्या. **ओ ८७**—तर यावेळपर्यंत त्या परस्परांनीं काय काय केलें तें सांग, असें धृतराष्ट्र संजयाला म्हणतो. **परस्परें**-परस्परांत.

( **श्लोक २** ) येथे संजय, " दुर्योधन पांडवांची सेना पाहून द्रोणाचार्यांकडे येऊन बोलला " असें धृतराष्ट्रास सांगतो. **ओ. ८८**—पांडवांच्या सेनेचें जें वर्णन ज्ञानेश्वरांनीं येथें केलें आहे, त्याला मुळांत कांहीं आधार नाहीं. मुळांतील ' अनीक ' यावर व्याख्यान करतांना, त्या सेनेच्या भयंकर स्वरूपाचें वर्णन ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेतूनच निर्माण झालें आहे **उचललें**-निघालें. ' उचलून आलें ' या अर्थी आपण लमवऱ्हाडाचा आजही उल्लेख करतो. 'हा शब्द महानुभावी वाङ्मयांतही आला आहे. पहा—' उपचारें अंगिची तवचा उचलली । उभा दर ये जवळिली । अवस्थाभरें पिसीं जालीं । नेणें अंगिचें सुख ॥५६१॥— नरेंद्र, रु. स्व. महाप्रलयांत कृतांतानें आपलें सर्वभक्षक मुख पसरावें, तसेंच तें सैन्य होतें. हें सैन्य आतां सर्वांचा संहार करणार असा यावरून भाव सूचित केला आहे. **ओ. ८९-उठावलें** - चाल करून निघालें. **एकावट**—' एकवट ' असा हा शब्द पाहिजे होता. एकवट=एकत्रित होऊन, व अशा अर्थी नरेंद्रानें तो वापरलाही आहे. पहा—' कीं नवे निधी चरति येकवट । चारा ब्रह्मसुखाचा ॥८५९॥ "–रु. स्व. **जैसे ९०**-ज्याप्रमाणें उलथलेलें कालकूट विष सर्वत्र पसरावें त्याप्रमाणें पसरलेलें. अशा तात्काळ मृत्यु आणणाऱ्या विषाला कोण थोपविणार ? विषाला स्पर्श करणें जेथे मुष्कील, तेथे त्याचा प्रतीकार कोण करणार ? येथे हें सर्व भक्षक व विषाप्रमाणें मृत्युप्रद असें सैन्य पसरलें. असें कटाक्षानें ज्ञानेश्वरांना सांगावयाचें असल्यानें, ' उलंडलें ' हा पाठच युक्त आहे. उलंडलेलें कालकूटच पसरणार. रा. हर्षे म्हणतात तसें ' उसळलेलें ' पसरणार नाहीं. **धरी कवण**-कोण प्रतीकार करणार ? अशा कालकूटासारख्या सैन्याला कोण थोपवून धरणार ?

**ओ. ९०** यावर आणखी उत्प्रेक्षा करतात. किंवा हें पांडवसैन्य म्हणजे प्रलयवातानें पोसलेला व म्हणून प्रदीप्त झालेला, व समुद्र शोषून टाकून त्याला

आकाशाला उठवून लावणारा वाडवानलच जणुं. **वडवानल**–समुद्राच्या पोटांतला अग्नि. नित्याचा अग्नि सर्व अरण्य जाळून टाकतो. पण हा सैन्यरूपी वडवानल नेहमीचा नव्हे. जो वडवानल प्रलयकालच्या वाऱ्यानें वृद्धिंगत झाला आहे, व प्रदीप्त होऊन ज्यानें सर्व समुद्र आटवून आकाशांत उठवून लावला, आहे असा हा जग जाळणारा वडवानल आहे. हें पांडवसैन्यही असेंच जग जाळणारें म्हणून ही उत्प्रेक्षा येथे साजेशी आहे. **सांदुकला**— प्रदीप्त झाला पहा– " वीजिता वारेयाचेनि फुकें । अंगिचें श्रीखंड सादुके " ॥ ५७६ ॥- नरेंद्र, रु. स्व. **पोखला**— पुष्ट झाला, वाढला. **उधवला**— उचलला, 'उठवला. पहा— " तेथ फुटले इंद्रनिळाचे बोरे। तैसा माथा उधविला आंधारें। कीं डोंगर उन्मळिले गरुडोद्गारें। पाचिंचे हे " ॥ ४७१ ॥-नरेंद्र रु. स्व. **ओ. ९१**—असें हें कृतांत, कालकूट व वणव्याप्रमाणें असणारें दुर्धर पांडवसैन्य अनेक व्यूहांनीं अलंकृत झाले आहे, तें सर्वत्र भयंकर रितीनें व्यापून राहिलें आहे. **आवरणें**— व्यापून असणें. **परिकर**— सुंदर, चांगलें. **व्यूह**—एक विशिष्ट प्रकारची सैन्यरचना. चक्रव्यूह, मकरव्यूह, असे अनेक आकृतीचे व्यूह असतात. अशा अनेक व्यूहांनीं सुंदर दिसणारें हें पांडवसैन्य, सर्वत्र भयंकर रितीनें व्यापून राहिलें होतें. **भयासुर**—आपण हल्लीं ' भेसुर ' म्हणतो. **ओ. ९२** – हें सैन्य दुर्योधनानें पाहिल्यानंतर कशा रितीनें त्याचा त्यानें अव्हेर केला म्हणाल, तर हत्तींच्या कळपाला सिंह जसा मोजीत नाहीं त्याप्रमाणें. सिंह हत्तींच्या कळपाकडे ज्या तुच्छतेनें पाहतो, त्या कळपाचें अस्तित्वही तो जसें मनांत आणीत नाहीं, तशाच तुच्छतेनें दुर्योधनानें त्या पांडवसैन्याकडे पाहिलें. **कवणे मानें**-कोणत्या पध्दतीनें. **पंचाननें**-सिंहानें. **गजघटा**—गजसमूह, हत्तींचा कळप. सिंहाच्या व हत्तीच्या कळपाच्या दृष्टांतानें, दुर्योधन व पांडवसैन्यांतील वैर व एकाची दुसऱ्याबद्दल असलेली तुच्छता व्यक्त केली आहे. मुळांत असा उल्लेख नसतांनाही दुर्योधनाच्या तिरस्कारभावनेचा ज्ञानेश्वरांनीं केलेला उल्लेख, अत्यंत मार्मिक व वस्तुस्थितीवर अधिक प्रकाश पाडणारा आहे.

( **श्लोक ३** )-येथे दुर्योधन, पांडवांची जी मोठी सेना धृष्टद्युम्नानें अनेक व्यूहांनीं अलंकृत केली होती, तिच्याकडे पाहण्यास द्रोणाचार्यांस विनवितो. **ओ. ९३**—द्रोणाजवळ मात्र दुर्योधन पांडवसेनेची खोटी महती गातो.

त्याच्या मतानें पांडवसैन्य कांहीं मोठें नव्हतें पण द्रोणाचार्यांना आपल्या भाषणानें ईर्षा चढावी व मग त्यांनीं आवेशानें पांडवांच्या सेनेबद्दल तुच्छतेनें बोलावें, अशा अपेक्षेनें दुर्योधन द्रोणाचार्यांपुढें पांडवांच्या सेनेचें वर्णन करीत आहे. दुर्योधनाचा हा भाव ज्ञानेश्वरांनीं येथे मुळापेक्षां अधिक व्यक्त केला आहे. **हा देखिला**–हा पाहिला काय ? असें हें प्रश्नार्थक वचन घ्यावें. **ओ. ९४**-या पांडवसैन्यांतील जे अनेक प्रकारचे व्यूह सभोंवती आहेत, ते जणु काय चालते गडकोटच असून, ते बुद्धिमान अशा द्रुपदकुमार धृष्टद्युम्नानें रचिले आहेत. व्यूहांतील सैन्य शिस्तवार हालचाल करूं लागलें म्हणजे, तो व्यूह चालणाऱ्या गडकोटाप्रमाणें लांबून पाहणाऱ्याला वाटत असे. ज्ञानेश्वरांनीं देवगिरीसारखे किल्ले पाहिले असण्याचा संभव आहे. म्हणून व्यूहांना चालत्या गिरिदुर्गाची लष्करी उपमा त्यांना सुचली आहे. व्यूहरचनेचें कार्य फार चातुर्याचें असतें. म्हणून त्याला मुळांतील ' धीमता ' या विशेषणाच्या आधारें ' बुध्दिमंतें ' असें म्हटलें आहे. **ओ. ९५**—जो धृष्टद्युम्न तुम्हीं शिकवून शाहणा केलात, व विद्येचें केवळ आश्रयस्थान व्हावा असें केलेत, त्यानेंच आपल्या सैन्यानें समुद्र झांकून टाकला आहे जणु. त्यानं पांडवसैन्य असं विस्तृत पसरलें आहे कीं, समुद्र देखील त्यानें झांकून जावा ! **सिकविला**—शिकविला गेला. **विद्येसि**-त्याला धनुर्विद्येचें केवळ आश्रयस्थान बनविलेत. **वसैठा**—वस्तिस्थान. पहा-" वास्तिचां सेवटीं स्वर्गींचे दारवठे । आरौते गंधर्वाचे वसैठे ॥ २११ ॥ "—नरेंद्र रुक्मिणीस्वयंवर. " सैन्यसिंधु पाखरिला " असा पाठ स्वीकारल्यास, " त्यानें सैन्यसागर पसरला " असा अर्थ होईल. पण " तेणें सैन्यसिंहु पाखरिला " हा पाठ मात्र दुरान्वित असून, तो येथे अस्वाभाविक वाटतो. त्यानें सैन्यरूपी सिंहाला पाखर घालून तयार केला " या म्हणण्यांत फारसें स्वारस्य नसून, सिंहावर कोणी पाखर अगर खोगीर घातलें आहे असें पाहण्यांत अगर ऐकण्यांत नाहीं. म्हणून हा पाठ अग्राह्य आहे. **देख**—पहा.

( **श्लोक ४** )—" पांडवांच्या सैन्यांत भीमार्जुनासारखे आणखी पराक्रमी असे युयुधान, विराट व द्रुपद असे वीर पुरुष आहेत " येथे ज्ञानेश्वरांनीं टीकेसाठीं ज्या तीन ओव्या रचल्या आहेत, त्यांत जवळ जवळ मुळाला धरूनच अर्थ केला आहे. फारसा विस्तार केलेला दिसत नाहीं. **ओ. ९७-प्रौढी**—

प्रौढीनें. ( तृ ) **ओ. ९८—सुभटु**—उत्तम योद्धा. **महारथी**-दहा हजार धनुर्धाऱ्याबरोबर युध्द करण्यास समर्थ असा मोठा योध्दा.

( **श्लोक ५-६** ) येथें पांडवसेनेंतील वीरांची आणखी नांवें सांगितलीं आहेत. **ओ. १००-सकळै जाणे**-या सर्वांना तूं जाण. **ओ. १०१ सुभद्रा-हृदयनंदनु**-सुभद्रेच्या मनाला आनंद देणारा. हें अर्जुनपुत्र अभिमन्यूचें वर्णन आहे. **अपरु नवा** इ०-जो दुसरा नवा अर्जुनच आहे. जो पराक्रमांत आपल्या वडिलासारख आहे. **ओ. १०२—मीति नेणिजे अपार**-ज्यांची संख्या, प्रमाण, कांहीं कळत नाहीं इतके जे अपार आहेत, ते तेथें जमले आहेत.

(**श्लोक ७-८**) **ओ १०३**-यांत दुर्योधन आपल्या सैन्यांतील नायक जातां जातां द्रोणापुढें बोलून जातो. **ओ. १०४-जाइजति बोलौनि**-बोलले जातात. **तुम्ही आदिकरूनि**-द्रोण आदिकरून दुर्योधन द्रोणाशीं बोलत असल्यानें, त्याचा त्यानें फक्त उल्लेख केला आहे. त्याच्या तोंडावर त्याची स्तुति त्यानें केलेली नाहीं. उलट आठव्या श्लोकांत भीष्म, कर्ण, कृप, इत्यादि वीरांचा त्यानें गौरवपर उल्लेख केला आहे. **ओ. १०५-गंगानंदनु**-भीष्म. हा गंगेपासून झालेला शंतनु राजाचा पुत्र, म्हणून त्याला गंगानंदनु म्हटलें आहे. जो आपल्या पराक्रमानें तळपणारा तेजस्वी सूर्यच. पहा-' प्रतापाचा जो न मावळे भानू '-रघुनाथ पंडित, नलो. पाख्यान. **रिपुगजपंचाननु**-शत्रुरूपी गजाचा सिंह. शत्रूंचा गाळण उडविणारा, हें विशेषण कर्णाला दिलें आहे. या भीष्म, कर्ण इत्यादिकांचा असा प्रभाव आहे कीं, हे मनांत आणतलि तर जगही निर्माण करतील, किंवा त्याचा संहारही करून टाकतील. **ओ. १०६-मनोव्यापारें**-इच्छामात्रेंकरून. ब्रह्मदेव, विष्णु व शिव हे जसे जगाचे उत्पत्ति, स्थिति व लयकर्ते आहेत तसेंच भीष्मादि वीर प्रति ईश्वर आहेत असा दुर्योधनाच्या म्हणण्याचा भाव. **हा कृपाचार्यु** इ०—हा कृपाचार्य तर एकटाही कुणाला संपणार नाहीं. **पुरणे**—संपणें, पुरा होणें. **ओ. १०७-अश्वत्थामा**-द्रोणाचार्यांचाच मुलगा. **पैलु**-पलीकडे. **आडदरु**-अडदर=भय. मृत्यु देखील ज्याचें भय सदा मनांत बाळगतो, असा अश्वत्थाम्याचा उल्लेख येथे केला आहे. कदाचित् तो पांच प्रसिद्ध चिरंजीव व्यक्तांपकीं एक असल्यानें, त्याला मृत्यूचें भय असण्याऐवजीं त्यालाच मृत्यु भितो असें त्याचा गौरवार्थ म्हटलें

असावें. **ओ. १०८-जेयांचिया** इ.—ज्यांच्या क्षात्रतेजाचें मोजमाप प्रत्यक्ष ब्रम्हदेवालाही ठाऊक नाहीं. त्यांचें बल साक्षात् ब्रम्हदेवाच्याही बुद्धीच्या आटोक्यांत येण्यासारखें नाहीं. इतकें तें अफाट आहे.

(**श्लोक ९**)—दुर्योधन या श्लोकांत आपल्यासाठीं प्राण खर्ची घालणाऱ्या व शस्त्रास्त्रांनीं मंडित अशा इतर अनेक युद्धकलाविशारद वीरांचा द्रोणाजवळ ओझरता उल्लेख करतो. एकंदरीनें आपल्या मागें अनेक श्रेष्ठ सेनापतींचा व स्वार्थत्यागी सैनिकांचा फड उभा आहे, असेंच त्याला सुचवावयाचें आहे. **ओ. १०९-शस्त्रविद्यापारंगत**-अनेक प्रकारचीं शस्त्रें योजण्यांत जे पटाईत आहेत. त्यावेळीं योद्धयांचा शस्त्रावर व अस्त्रावर मुख्य भर असे, व हीं वारुणास्त्र, अग्न्यस्त्र, सर्पास्त्र अशीं विविध अस्त्रें, केवळ मंत्रानें सोडलीं जात. म्हणूनच अशा अस्त्रांचे मंत्र जपणारे जे वीर, त्यांना येथें मूर्तिमंत मंत्रावतार म्हटलें आहे. त्यांच्या रूपानें मंत्रांनींच अवतार घेतला आहे जणु असे. **हो काज**—फार काय. **अस्त्रजात**—अस्त्रांच्या समूहांना या वीरांपासूनच प्रसिद्धी मिळाली. या वीरांनीं या विविध अस्त्रांचा पहिल्यानें उपयोग केल्यानंतरच तीं जगांत रूढ झालीं, इतरांनीं नंतर त्यांचा प्रचार केला. तात्पर्य अस्त्रविद्येच्या प्रारंभाला हेच वीर कारण आहेत. **पशौनि**—या वीरांपासून. **ओ. ११०**—असे हे कीं, ज्यांना कोणीही प्रतिस्पर्धी नाहीं असे असूनही, व ज्यांच्या अंगांत भरपूर शौर्य असूनही, ज्यांनीं आपले प्राण मलाच अर्पण केले आहेत. **अप्रतिमल्ल**—ज्यांस कोणी प्रतिस्पर्धी नाहीं असा. जे युद्धकलेंत एकमेव आहेत असे. **पुरता**—पुरेसा, परिपूर्ण. वास्तविक अशी ज्यांची परिस्थिति आहे, त्यांना कोणावर विसंबून राहण्याचें कारण नाहीं. पण दुर्योधनाचें म्हणणें असें कीं, ते केवळ आपल्यावरील प्रेमामुळेंच आपल्यासाठीं प्राण देण्यास तयार झाले आहेत. हीच योद्धयांची भावना पुढील ओवींत पतिव्रतेच्या अनुरूप दृष्टांतानें व्यक्त केली आहे. **आराइलें**—आराइणें=अनुकूल असणें. **ओ. १११**-पतिव्रता स्त्रीचें मन आपल्या पतीशिवाय परपुरुषावर कदापि जात नाहीं. त्याप्रमाणें या वीरांचें मीच सर्वस्व होऊन बसलों आहे, असें दुर्योधनाचें सांगणें. **ओ. ११२**—दुर्योधन पुढें आणखी त्यांची स्वामिभक्ति वर्णन करतो. "आमच्या कोणत्याही कार्यापुढें हे वीर आपलें जीवित अगदींच अल्प मानतात. असे

हे स्वामिभक्तीनें मोठे चोख आहेत." **पाडें**—तुलनेनें. **थोडें**—यःकश्चित्. जे आपल्या जीविताला स्वमिकार्यापुढें तृणवत् मानतात. **निरवधि**—अत्यंत. **ओ. ११३**—पुढें त्यांचेंच वर्णन चालू आहे. **जूझती कुलकेणी**—युद्धाचें चातुर्य. 'जूझती' हें 'कुलकेणी' चें विशेषण घ्यावें. विशेष्याचेंच लिंग विशेषणाला लावण्याची तत्कालीन भाषेची लकब पाहतां, 'जूझती' हें विशेषण घेणेंच युक्त होय. जे युद्धकौशल्य पूर्ण जाणतात. **कले कीर्तिसि जीति**—जे कलेनं व कीर्तीनें जगतात. युद्धकलेवर व वीराच्या लौकिकावरच जे मानानें आपलें जीवन व्यतीत करतात. **हे बहु असो इ०**—फार काय, क्षात्रवृत्तीचा किंवा वीरवृत्तीचा जन्मच मुळीं या वीरापासून झाला, असें म्हणतां येईल. **ओ. ११३—पुरते**—सर्वांगपरिपरिपूर्ण. **आता काइ इ०**—"आतां यांची गणना तरी कशी करूं, किती म्हणून करूं! हे अपार आहेत, असंख्य आहेत, एवढेंच म्हणतो." **आमतें**—आम्हाला, आमच्याकडे.

(**श्लोक १०**)-भीष्माच्या सेनानायकत्वाखालील आमचें सैन्य अपरंपार असून, भीमाच्या सेनाधिपतित्वाखालीं असणारें त्यांचें (पांडवांचें) सैन्य परिमित, अल्प आहे, असें दुर्योधन द्रोणाचार्यांना सांगतो. गीतेच्या प्रस्तुत श्लोकांतील 'अपर्याप्त' व 'पर्याप्त' या शब्दांचें यौगिकार्थ सोडून आनंदगिरी व नीलकंठ या भारतटीकाकारांनीं त्यांचें आपल्या इच्छेप्रमाणें अगदीं विरोधी अर्थ कसे दिले आहेत, याचें रा. हर्षे यांनीं आपल्या ज्ञानेश्वरीप्रतींत विवेचन केलें आहे. महाभारताचा संदर्भ पाहतां, पांडवांचें सैन्य कौरवांपेक्षां चार अक्षौहिणींनीं कमी असूनही, दुर्योधनाला आपल्या यशाबद्दल खात्री वाटत नव्हती. या दृष्टीनें पाहिल्यास भीष्माच्या अधिपत्याखालीं असणारें आपलें सैन्य त्याला कमतर वाटत असून, भीमाच्या हुकमतीखालील पांडवांचें सैन्य त्याला पुरेसें, परिपूर्ण असेंच वाटत होतें. पण दुर्योधनाची ही साशंक मनःस्थिति महाभारतावरील टीकाकारांनीं लक्षांत घेतली नसून कौरवांचें सैन्य अकरा अक्षौहिणी व पांडवांचें सैन्य सात अक्षौहिणी होतें याच केवळ आधारावर, 'अपर्याप्त' व 'पर्याप्त' या शब्दांचे त्यांनीं अनुक्रमें 'अपरंपार व 'अपुरे' असे अर्थ केले आहेत. ज्ञानेश्वरांनींही याबाबतींत संस्कृत टीका-

कारांना अनुसरून तसेच अर्थ केल्यानें, युद्धांतील जयाबद्दल मूळचा साशंक असणारा दुर्योधन, त्यांच्याकडून भलताच आत्मविश्वास बाळगणारा व पांडवाबद्दल तुच्छता दर्शविणारा असा रंगविला गेला आहे. **ओ. ११५**—येथून कौरवांचा पहिला सेनापति भीष्माचार्य, यांचें वर्णन लागतें. **जगजेठी**—जगांतील बलवान् पुरुष, मल्ल. पहा—' वसंतु वन-देवतांसीं सांगे गोष्टी । तेणें उठीति अनंगाचिया दाटी । म्हणौनि विषया जगजेठी । माल्हाडी नाचतातीं ॥ ७७३ ॥ —नरेंद्र-रु. स्व. **दलवैपणाचा**—दलपतिपणाचा, सेनापतित्वाचा. **पाटु**—बहुमानाची जागा. पहा—" काळियानें पाटीं बैसावें । काइ राजकन्येचां ? ॥२०६॥—नरेंद्र-रु. स्व. त्या या भीष्माला सेनापतिपदाचा बहुमान मिळाला आहे.

**ओ. ११६**—आता या भीष्माच्या बळानें युक्त असें हें आमचें सैन्य, जणु काय शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज असणारा किल्लाच असून, त्याच्यापुढें लोकत्रय देखील थिटेंच वाटतें, असें दुर्योधन म्हणतो. **गवसलें**-हुडकून काढलेलें, अर्थात युक्त. **पन्नासिलें**— पानासिलें, पानासणें=सज्ज करणें. पहा- " झाडुनि जंघनाचे कडे । पानासिले नितंबाचे हुडे ॥ ४४२ ॥- भास्करभट्ट, उध्दवगीता. हा शब्द ज्ञानेश्वरींतही आला आहे. " अपानाचिया कवाडा । लावूनि आसनमुद्रा सुहाडा । मूळबंधाचा हुडा । पन्नासिला ॥ ४८ ॥ " ज्ञानेश्वरी-१२. **पणें मानें**—या सैन्याच्या मानानें. **थेकुलें**—थिटें, थोडकें. **ओ. ११७**-समुद्र मूळचाच कसा आहे ? तेथें दुर्घट परिस्थिति कोणाच्या अनुभवाला येत नाहीं ? अशा समुद्रालाहि वडवानल साह्यकर्ता झाल्यास मग काय विचारावें ? **दुवाडपण**-कठिणत्व, दुर्घटत्व, द्वाडपणा. **विरजा**—साह्यकर्ता. समुद्र व वडवाग्नि यांची जोडी जमल्यावर मग पृथ्वीप्रलयाला काय उशीर ? तसेंच कौरवांचें मूळचें प्रचंड सैन्य व त्याला भीष्माचार्य सेनापति, असा योग जुळल्यावर मग शत्रूच्या नाशाला काय वेळ असा भाव **ओ. ११८**-किंवा प्रळयकाळचा अग्नि व त्याला फुंकर घालणारा महा झंझावात अशी जोडी जमावी, त्याप्रमाणेंच अगोदर भीष्मासारखा गाढा योध्दा व त्यांत पुनः तो सेनापति असावा, हा योगायोग होय. **सांघातु**-संगति, संयोग. **गंगासुत**—गंगापुत्र भीष्म. **ओ. ११९**-आता या भीष्माबरोबर कोण युद्ध करणार, त्याला कोण तोंड

देणार ? कारण खरोखरच हें पांडवसैन्य फार थोडें असून, अत्यंत क्षुल्लक असें दिसत आहे. **वरिचिलेंनि**—वरिचिल=वरवरचा, क्षुल्लक. येथें महानुभावी वाङ्मयांतहीं 'वरिचिल' असाच शब्द वापरला आहे. त्यामुळें राजवाड्यांचा '३० इचिल' हा पाठ ग्राह्य वाटत नाहीं. पहा–जया वरिचिला विकाराचिया वर पंक्तीं । तियेंचि सेहार्णी बोलिजेति लोकीं ॥ ५१९ ॥– नरेंद्र रु. स्व. **ओ. १२०**- यांत पांडवांचा सेनानी जो भीमसेन, त्याच्याबद्दल दुर्योधनाचा उपहासयुक्त मत्सर व्यक्त झाला आहे. **बेंथु** – दांडगा, आडदांड. अगोदर सैन्य थोडें व त्यांत भीमसेनासारखा आडदांड, ज्याला लष्करी पांचपेंच कांहीं समजत नाहींत असा असल्यावर मग काय विचारावें ! दुर्योधनानें या विषयावर बोलायचेंच सोडून दिलें. तो विषयच त्यानें सोडून दिला. यांत पांडवांचें काय होणार, याबद्दल त्याची खात्री फारच परिणामकारकरितीनें ध्वनित करण्यांत आली आहे. ज्ञानेश्वरांनीं दुर्योधनाचे सूक्ष्मभाव, त्याचे पांडवसैन्याच्या परिस्थितीबद्दलचें व भीमसेनाबद्दलचें मत, येथे फारच हलक्या हातानें रंगविलें आहे.

( श्लोक ११.)—" आपापल्या सैन्याच्या विभागाप्रमाणें सर्व व्यूहांच्या प्रवेशद्वारीं व्यवस्थित राहून तुम्हां सर्वांनीं भीष्माचेंच रक्षण करावें. " ही दुर्योधनाची महत्वाची सूचना मुळांत तरी द्रोणाचार्यांनाच अनुलक्षून आहे. भीष्म सोडला तर बाकीच्या वीरांत द्रोणाचार्यच श्रेष्ठ होते. म्हणून दुर्योधन त्यांना ही महत्वाची गोष्ट लक्षांत ठेवण्यास सांगत आहे. सेनापति म्हणून भीष्माचेंच सर्वांनीं रक्षण करणें शिस्तीच्या व परिणामाच्या दृष्टीनें योग्यच होतें. कारण सेनापतीच पडल्यावर सर्व सैन्याची दाणादाण होते. ज्ञानेश्वरांनी या श्लोकांतील दुर्योधनाची सूचना, सर्व सैनिकांसह द्रोणाचार्यांना अनुलक्षून आहे असें मानलें आहे. **ओ. १२१-सरिसे करा**-बरोबर करा, सारखे करा. आतां आपापल्या सैन्याचें विभाग बरोबर करा, शिस्तवार करा. इकडे तिकडे अव्यवस्थित उभे राहिले असतील त्यांना एका रांगेत आणा. कारण आतां लवकरच युद्ध सुरूं होण्याची वेळ आली आहे. पहा- " पाउल सरिसा करौनि तांबूळ सांडी । बहु आळोवु आंगीं ॥ ३९४ ॥- नरेंद्र, रु. स्व. **ओ. १२२**—आपापल्याकडे निरवलेले सैन्यभाग, वीरांनीं कसे ठेवावे ते सांगतात. **अक्षौहिणी**—

२१८७० रथ, तितकेच हत्ती, ६५६१० घोडे, व १०९३५० इतके पायदळ, मिळून जी संख्या होते ती. अशा सैन्यसंख्येच्या अक्षोहिणींचे विभाग, निरनिराळ्या वीरप्रमुखाकडे देण्यांत आले होते, व त्यांनाच मुख्य सेनापति भीष्माचार्य यांचें रक्षण करण्याची आज्ञा देण्यांत आली होती. **आरणीं**-युध्द भूमीवर. **वरगण**-वर्गणी, वांटणी. ज्याला सैन्याच्या ज्या अक्षोहिणी हुकमतीखाली मिळाल्या असतील, त्यानें त्या युध्दभूमीवर आणाव्या. ज्या कोणा महारथ्याला जो सैन्य-विभाग वाटणीनें मिळाला असेल, तो त्यानें आपल्या ताब्यांत ठेवावा (आवरिजे). **ओ. १२३, आवरणें**-ताब्यांत ठेवणें. त्या त्या सैन्यविभागावर त्या त्या महारथीनें हुकमत चालवावी, व अशी हुकमत चालविली तरी मुख्य सेनापति भीष्माचार्य यांच्या आज्ञेखालींच त्यानें वागलें पाहिजे. कोणी स्वतंत्रपणें कांहीं हालचाल करूं म्हणेल तर तें चालणार नाहीं, असा भाव. **भीष्मातळीं**-भीष्माच्या हाताखालीं, त्याच्या आज्ञेखालीं. **म्हणे द्रोणातें** इ.-द्रोणादि सर्व प्रमुख वीरांना दुर्योधनानें ही मुद्दामहून ताकीद दिली आहे. कदाचित द्रोणासारखे योद्धे आपल्याच अधिकाराच्या व पराक्रमाच्या डौलांत भीष्माची हुकमत मानणार नाहींत, अशी शंका दुर्योधनाला आली असावी. **ओ. १२४**—दुर्योधन पुढें आणखी निर्वाणीचें बजावतो. " या एकट्या भीष्माचें सर्वांनीं रक्षण करावें, नव्हे, माझ्यावर जशी सर्वांची निष्ठा आहे, तीच याच्यावर ठेवावी. तो मीच आहे असें मानावें. कारण या भीष्मामुळेंच आमचें सैन्य, ' सैन्य ' या शब्दाला पात्र झालें आहे. " आमच्या सैन्याला जो सैन्यपणा आला आहे, जें रूप आलें आहे, तें या भीष्मामुळेंच. म्हणून याला माझ्या ठिकाणीं मानून याचें कसोशीनें रक्षण करावें. **आघवा**—(अवघा), सर्व. **साचु**-खरा.

(**श्लोक १२**)-" दुर्योधनाच्या मनांत उत्साह व आनंद उत्पन्न करणाऱ्या त्या पितामह कुरुवृद्ध भीष्मानें मोठ्यानें सिंहनाद करून शंखही फुंकला, " असा या श्लोकाचा सरळ अर्थ आहे. पण ज्ञानेश्वरांनीं ' तस्य संजनयन् हर्षं ' हें भीष्माकडे घेतलें आहे असें वाटतें. कारण याचा अनुवाद, ते ' एया बोला सेनापति संतोखला ' असा करतात. दुर्योधनानें वर द्रोणादिकांना जी ताकीद दिली व भीष्माबद्दल जो आदर व्यक्त केला, तें सर्व संभाषण भीष्माचार्यांनीं ऐकलें, असें येथें गृहीत धरावें

लागतें, आपल्याबद्दल दुर्योधनानें एवढी काळजी वाहावी, त्यानें आपला एवढा मांन ठेवावा, त्याबद्दल भीष्माला संतोष होणें साहजिक आहे. पण मूळ गीतेच्या श्लोकाचा वर जो चरण उध्दृत केला आहे, त्यावरून या प्रसंगाला आधार नसावा.

**ओ. १२५, सेनापति**—भीष्माचार्य. **संतोखला**—संतोषला. **सिंहनादु**-योध्यानें सिंहाच्या आरोळीप्रमाणें केलेला आवाज. या आवाजानें भीष्मानें आपलें सेनापतित्व व युद्धाचा होणारा आरंभ सूचित करून, वास्तविक दुर्योधनांत उत्साह उत्पन्न केला. भीष्मासारख्या आपल्या सेनापतीनें युध्दाची तयारी सिंहनादानें व शंखनादानें जाहीर केल्याचें पाहून दुर्योधनाला आनंद झाला असणार! **ओ. १२६, प्रतिध्वनि** इ०—त्या भीष्माच्या सिंहनादाचा प्रतिध्वनि, पडसाद, तिन्ही लोकांत न मावण्या इतका प्रचंड झाला. तो प्रतिध्वनि होण्याचें थांबलेंच नाहीं, तो सारखा होतच होता. **उपजतसे**—होतच राहिला. भीष्मानें एकदाच सिंहनाद केला पण त्याचा प्रतिध्वनि सारखा घुमत राहिला. **ओ. १२७**—त्या प्रतिध्वनीबरोबरच भीष्मदेवानें आपल्या वीरवृत्तीच्या बळानें आपला दिव्य शंख फुंकला. **तुलिग**-तुलग=प्रतिध्वनि. **थाव**-बळ. **आस्फुरणें** वाजविणें. आपणच केलेल्या सिंहनादाच्या पडसादाबरोबरच भीष्मानें आपल्यांतलें बळ एकवटून आपला दिव्य शंख फुंकला. **ओ. १२८**-भीष्मानें केलेल्या सिंहनादाच्या व शंखनादाच्या एकत्रित आवाजानें, त्रैलोक्याच्या कानठाळ्या बसल्या. जणु काय आकाश तुटून खालीं पडावें, इतका प्रचंड तो आवाज भासला. **ओ. १२९**-त्या आवाजानें एकंदर वातावरणांत कसा भयंकर परिणाम घडला, तें वर्णन येथें आलें आहे. **घडघडीत**-घडघडणें= खालीं येणें. तो आवाज एवढा जोराचा झाला कीं, त्यानें आकाश खालीं कोसळलें, असे वाटलें. आकाश कोसळल्यानें जो आवाज होईल, तेवढा त्या दोन नादांचा एकत्र आवाज झाला. **उचंबळत सागर**-तो आवाज समुद्रावर आपटून त्यामुळें त्यांतील पाणी बाहेर उचंबळलें, हेंदकळलें. **क्षोभले** इ०-सर्व स्थावरजंगमात्मक जग भीतीनें कापूं लागलें, असा त्या आवाजाचा प्रभाव. **ओ. १३०**-भीष्माच्या त्या सिंहनाद व शंखनादांच्या एकत्र होणाऱ्या आवाजानें पर्वतांच्या गुहा दुमदुमून गेल्या. तो आवाज गुहामधून घुमला. **गिरिदरें**-

पर्वतांच्या दऱ्या. **रणतुरें**-रणवाद्यें. हींच पुढील श्लोकांत दिलीं आहेत. **आस्फालिलीं**-वाजूं लागलीं.

( **श्लोक १२** )-येथें हीं रणवाद्यें दिलीं असून, तीं सर्व एकसमयावच्छेदानें वाजल्यानें, तेथें फारच मोठा आवाज झाल्याचें सांगितलें आहे. **ओ. १३१—उद्दंड इ०**-पुष्कळ रणवाद्यें एकदम वाजूं लागलीं. **उद्दंड**—उदंड, असंख्य. **सैघ**-एकदम. **खाखातें**—कर्कश. तीं वाद्यें भयानक व कर्कश होतीं या रणवाद्यांच्या आवाजानें धडधाकटांना जेथें महाप्रलय झाला असें वाटलें, **धाकड**-बलिष्ट, धैर्यवान्. **ओ १३२**-तेथें भित्र्यांची कथा काय ? **भेडांची**-भित्र्यांची काय स्थिति झाली असेल, ती काय वर्णन करायची ! **मातु**—गोष्ट, कथा. **कांचेया इ०**-कच्च्या दिलाचे लोक, कचऱ्याप्रमाणें केव्हांच उडून नाश पावले. कच्च्या दिलाचे लोक हेच कोणी केर व ते नष्ट झाले, असें येथे वर्णन आहे. **कांचेयां**-कच्चेयां, कांचेया. **केर फिटणें**-केराप्रमाणें उडून जाणें, नाश पावणें. **जेणे इ.**—ज्या आवाजानें प्रत्यक्ष मृत्यूला देखील धास्ती बसून तो अंग धरीनासा झाला. भ्यालेला मनुष्य अंग धरीत नाहीं, तो खंगतच जातो. येथें प्रत्यक्ष मृत्यूला देखील धसका बसल्यानें, तो धष्टपुष्ट होईनासा झाला. **अंग नेघे**-अंग न धरी. **ओ. १३३**-येथें ज्ञानेश्वरांनीं वाद्यांचे अनेक प्रकार दिले आहेत. ते मुळाहूनही अधिक आहेत. पणवानक, गोमुख वगैरे वाद्यांचा उल्लेख त्यांनीं केलाच नाहीं. **भेरी**-नगारे. **निशाण**-हेंही एक रणांगणावरील चर्मवाद्यच आहे. **मांदल**-मृदंग. **टिविला**-टिवाळ=वाद्यविशेष, नडगी. पहा—" घुरघुरितीं टिवाळा । "-भास्कर, शिशुपालवध, ५२३. **शोंगळ**—तुतारी, पिपाणी, कर्णा. या ओंवीत पहिलीं तीन चर्मवाद्यें असून, बाकीचीं तीन तोंडानें वाजविण्याचीं आहेत. **आणि इ.**-या वाद्यांच्या भयंकर आवाजाबरोबरच तेथें योद्धयांचा रणांगणावरील गोंगाट होताच. **रणकोल्हाळ**—युध्दभूमीवरील वीरांचा गोंगाट. **ओ. १३४**-याच गोंगाटाचें तपशीलवार वर्णन आणखी दिलें आहेत **आवेशें इ.**-आवेशानें दंड थोपटीत होते. **थाहाटणें**-वाजविणें. **विसणैले**-विसणणें=आवेशयुक्त होणें, सरसावणें. वीर आवेशयुक्त होऊन परस्परांना हांका मारीत होते. **जेथ इ.**—अशा या रणकल्होळांत मदोन्मत्त हत्ती देखील धर धरीनात. ते देखील या आवाजानें भ्याले. **धराति, ना**-धैर्य धरीनात. **ओ १३५** - या भयंकर कोल्हाळानें भिऊन गेल्यामुळें, कांहीं वीरांचे उभ्या उभ्याच प्राण गेले, चांगल्या चांगल्या धरिष्टाच्या माणसांच्या दांत-

खिळ्या बसल्या, व जे अगदी ब्रीदाचे मालक होते, जे लौकिकवान् वीर होते, ते देखील थंडगार झाले. **चांग**-चांगले, धैर्यसंपन्न. **दांत बसणें**-दांतखिळी बसणें. **बिरुदाचे दादुले**- ब्रीदाचे, पराक्रमाची चिन्हें धारण करणारे, ब्रीदाचे स्वामी. पहा— ' आन श्रीकृष्ण हा दादुलेयांचा दादुला । माल्हाती मुनेश्वरांतें ॥ ३८३ ॥-नरेंद्र, रु. स्व. **हींव—बर्फ.** पहा-'' हीमावतीयेचें आटीलें हींव । तें दळवाडें काढुनि चिरीव ॥ ४१६ ॥—" नरेंद्र-रु. स्व. ज्यांनीं अगदीं लढाईत नांव करून लौकिक मिळविला, असे वीर देखील या रणकोल्हाळानें बर्फासारखे थंड पडले. **ओ. १३६**—या व पुढील ओवींत या कोल्हाळानें स्वर्गांत देखील कसा आकांत उडवून दिला, त्याचें वर्णन आलें आहे. **तुरबंबाळु**-वाद्यांचा मोठा आवाज. पहा-" आइकौनि भीमकु पुसे मातु । हा वाजांत्राचा काइसा बंबाळु ॥ "-महदंबेचे धवळे--३८ **आइकोनि** इ०—हा रणवाद्यांचा आवाज ऐकून ब्रह्मदेव देखिल व्याकुळ झाला, व इतर देवांना तर प्रलयकाल ओढवला असें वाटलें. देवांना इतकें भय वाटल्यावर माणसांना काय झालें असेल, याची कल्पनाच केलेली बरी. **ओ. १३७**- या रणवाद्यांच्या प्रचंड आवाजानें स्वर्गांत अशी परिस्थिती झाली. पण येथपर्यंत संजय धृतराष्ट्राला कौरवांच्या सैन्याची हालचाल कळवीत असून, त्यानें पृथ्वीवर व स्वर्गांतही देवांची कशी गाळण उडवून दिली आहे, याचें त्यानें वर्णन केलें. यापुढें १४ श्लोकापासून पांडवांच्या सैन्याची हालचाल तो धृतराष्ट्रास त्याच्या प्रश्नाप्रमाणें सांगणार आहे.

**(श्लोक १४)**—यानंतर चार पांढरे शुभ्र घोडे जोडलेल्या दिव्य व मोठ्या रथांत बसलेल्या श्रीकृष्ण व अर्जुनांनीं आपापलें सुंदर शंख वाजविले. शंख वाजविणें हें योध्दयाच्या आगमनाचें द्योतक होय. श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांनीं असेंच आपल्या शंखवादनानें आपण रणांगणावर युध्दार्थ आल्याचें जाहीर केलें. **ओ. १३८**· हें अर्जुनाच्या मोठ्या रथाचें वर्णन आहे. **सार विजयाचें** -हा रथ म्हणजे यशाचें जणु सारच. **हो काज**-जणु काय. घोडे पांढरे असल्यानें, विजय हा ठरलेलाच. शुभ्र वर्ण यशाचा सूचक आहे. **किं तें** इ.–किंवा तो रथ म्हणजे तेजाचे भांडारच जणु. तो रथ असा तेजस्वी होता कीं, विश्वासांतील सर्व तेज त्याच्यांत सांठविल्या· प्रमाणें भासलें. **जेथ** इ.–ज्या रथाला गरुडाचे जुळे भाऊच असे चार ( घोडे ) जणु काय कांतून तयार केलेले असे जोडले होते. **आवळिचे**-जुळे, गरुडाचे जुळे,

म्हणण्याचा अर्थ असा कीं, जे गतीमध्यें गरुडाप्रमाणें वेगवान् होते. त्या घोड्यांची गरुडभरारी पाहून त्यांना गरुडाचे जुळे भाऊ असें सार्थतेनें म्हटलें आहे. **कांतले**-कांतून कोरून तयार केलेले. ते घोडे असे रेखीव होते कीं, ते विधात्यानें हातानें घडविलेले नसून, ते जणु काय धसावर कांतून तयार केले होते. ज्ञानेश्वरकालीं घोड्याच्या वर्णनांत, 'कांतला' असा शब्द बहुधा आलेला आहे. पहा— "तो कैसा दिसताए कांतला। जैसा अमृतरसाचा ओतिला। कीं श्रेष्ठेंनें घडा घातला। रेवांतकासी॥ ९९४॥—भास्करभट्ट, शिशुपालवध. यावरून ज्ञानेश्वरींत 'कांतले' हा पाठच मूळचा असला पाहिजे व तोच बरोबर आहे. **च्यारी**—चार घोडे. **ओ. १३९**—तो रथ म्हणजे पंखाचा मेरु पर्वतच जणु. पूर्वी पर्वतांना पंख होते, तशांत मेरु पर्वत सोन्याचा. या दोनी दृष्टीनें पंखाच्या मेरूची उत्प्रेक्षा अर्जुनाच्या रथावर केली आहे. तो रथ मेरुप्रमाणें प्रचंड, झळझळीत व वेगवान् होता. पंख असतांना मेरु जसा वेगवान् होता, सुवर्णाचा असल्यानें मेरु जसा देदीप्यमान् होता, व मेरु हा पर्वत असल्यानें तो जसा प्रचंड होता, त्याप्रमाणें अर्जुनरथ, वेगवान् कांतिमान् व प्रचंड होता असा अर्थ. **रहुवरु**—रथ. **मिरवत असे**—शोभत असे. **तेजें** इ.—ज्याच्या तेजानें दिशा कोंदाटल्या, भरल्या. **ओ. १४०**—"ज्या रथाचा सारथी स्वतः वैकुंठाचा राजा श्रीकृष्ण त्या रथाचे गुण मी काय वर्णन करून सांगणार!" असें ज्ञानेश्वर येथे भक्तिभावानें म्हणतात. **ओ. १४१**—रथाचें वर्णन पुढें चालू केलें आहे. "ज्या रथाच्या ध्वजावर प्रत्यक्ष शंकराचा अवतार असा हनुमान् आहे, व ज्या रथाचें सारथ्य करीत श्रीकृष्ण अर्जुनासह बसला आहे. **ध्वजेवरि वानरु**—अर्जुनाच्या रथावर मारुति बसलेला आहे, तो शंकराचा मूर्तिमंत अवतार असें समजतात. **शार्ङ्गधर**-विष्णु, श्रीकृष्ण. **ओ. १४२**-यांत श्रीकृष्णाचाच महिमा वर्णन केला आहे. "परमेश्वराची मौज अशी कीं, तो जें अर्जुनाचें सारथ्य करीत आहे, तें भक्ताबद्दल उत्कट प्रेमच होय." आपल्या भक्तासाठीं असलें हलकें काम करण्यांतही श्रीकृष्णाला कमीपणा वाटला नाहीं, यांतच त्याचें भक्तवत्सलत्व दिसून येतें.

**( श्लोक १५ ) – येथे श्रीकृष्णानें आपला पांचजन्य, अर्जुनानें देवदत्त व भीमानें आपला पौंड्र नांवाचा मोठा शंख वाजविला," एवढेंच फक्त सांगितलें आहे.**

पण ज्ञानेश्वरांनीं त्या शंखांच्या भीषण आवाजापुढें, कौरवसैन्यांतील वाद्यांचा आवाज कसा लोपून गेला, याचेंच वर्णन केलें आहे. **ओ. १४३—पाइकु**—श्रीकृष्णानीं अर्जुनाला मागें रथांत बसवून व आपण पुढें बसून त्याचें सारथ्य पत्करलें, यांत खरोखरच त्यांनीं भक्ताला पाठीशी घालण्याची, त्याला अभय देण्याची म्हण सार्थ करून आपलें भक्तवत्सलत्व सिद्ध केलें, हा भाव येथें ज्ञानेश्वरांनीं फारच मार्मिक अशा श्लेषानें सांगितला आहे. नाहींतरी वास्तविक सारथी रथाच्या पुढेंच बसतो व त्याच्या मागें मालक रथाच्या हौद्यांत बसतो. यांत सारथी आपल्या मालकाला पाठीशींच घालीत असतो. येथे अर्जुनाचा सारथी होण्यांत श्रीकृष्णाचा हाच उद्देश होता, असें ध्वनित करण्यांत आलें आहे. अर्जुनाला पाठीशीं घालणें, त्याचें रक्षण करणें, हेंच श्रीकृष्णाचें अपूर्व सारथ्य असून, त्यांतच त्याचें भक्तवत्सलत्व व्यक्त झाल्याचें येथे कोटिबाजपणानें सूचित केलें आहे, **पांचजन्य**—हा श्रीकृष्णाचा प्रसिद्ध शंख आहे. **आस्फुरिला**—वाजविला. **अवलीला**—सहज. **ओ. १४४**—श्रीकृष्णानें आपला शंख वाजविला तो नेहमीप्रमाणेंच सहज वाजविला. पण या स्वाभाविक गोष्टीचा परिणाम असा झाला कीं, त्यानें कौरवसैन्यांतले इतर आवाज कुठल्या कुठं गिळून टाकले, या शंखाच्या आवाजांत ते लुप्त होऊन गेले. परमेश्वर एखादी गोष्ट सहज करून जातो, पण ती इतरांना कशी भयंकर होते, हाच येथे भाव आहे. **गहीरु**—गंभीर. **जैसा इ.**—ज्याप्रमाणें सूर्य उगवतांच आकाशांतील नक्षत्रांना लोपवितो, तद्वतच या पांचजन्याच्या गंभीर आवाजानें रणक्षेत्रावरील इतर आवाज लुप्त करून टाकले. **ओ. १४५**—"त्याप्रमाणें सभोंवतीं कौरवांच्या सैन्यांत रणवाद्यांचे जे आवाज गाजून राहिले होते, ते कुठं हारपून गेले कुणाला ठाऊक!" **ओ. १४६-तैसांचि** इ.-त्याच गंभीर आवाजानें. श्रीकृष्णाचा पांचजन्य ज्या गंभीर आवाजानें वाजला, त्याच गंभीर आवाजानें अर्जुनानें आपला देवदत्त शंख वाजविला. दोघांच्याही शंखांचे सारखेच प्रचंड आवाज झाले असा अर्थ. **देवदत्त**-अर्जुनाच्या शंखाचें नांव. **ओ. १४७—दोनी शब्द**-श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या शंखांचे आवाज. **मीनले एकावट**—एकत्र मिसळले. त्या दोघांचा एकत्र आवाज झाला. **तेथ** इ.—त्यामुळें या ब्रह्मांडाचे शंभर तुकडे होणार असें वाटलें. **ब्रह्मकटाह**—ब्रह्मदेवाची कढई म्हणजेच हे ब्रह्मांड. पहा—"रसा गे ब्रह्मकटाहो होतुसे। सपोत

कुंकुमाचा ॥—नरेंद्र, रु. स्व. **शतकूट**—शंभर तुकडे. " ब्रम्हकटाहः शतकूटो भवितुं अर्हति " अशा तऱ्हेची संस्कृत वाक्यपद्धति येथें ज्ञानेश्वरांनीं अवलंबलेली आहे. **पांत**—पाहत. **ओ. १४८**—श्रीकृष्ण व अर्जुन यांनीं शंख वाजविलेले पाहून भीमाला देखील आतां चेव आला. **विसाणैला**—आवेशला, सरसावला. पहा मागे ओ. १३४. जसा महाकाल, महामृत्यु खवळावा, तसा भीमसेन खवळला. **पौंड्र**—भीमाचा शंख. **आत्राटिला**—त्राहाटिला, असें पाहिजे होतें. त्राहाटणें=वाजविणें. पहा मागें ओ. १३४. मुळांतील ' भीमकर्मा ' या भीमाला लावलेल्या विशेषणाचा अनुवाद ज्ञानेश्वरांनीं गाळला आहे.

( **श्लोक १६** )—राजा युधिष्ठिरानें आपला अनंतविजय नांवाचा शंख व नकुल सहदेव यांनीं अनुक्रमें सुघोष व मणिपुष्पक असें आपापले शंख वाजविले. **ओ. १४९—तो १०**—हें भीमाच्या शंखाचेंच वर्णन, यांतही पहिल्या दोन चरणांत आहे. भीमाच्या शंखानें प्रलयकालच्या मेघाप्रमाणें गंभीर असा गडगडाट केला. **घडघडणें**—येथे ओ. १२९ प्रमाणें, ' घडघडणें ' याचा ' तुटून पडणें ' असा अर्थ न करतां, ' घडघड असा आवाज करणें ' असा अर्थ केला पाहिजे. **आपूरिता**—' आस्फुरिता ' असें पाहिजे होतें. आस्फुरणें–वाजविणें. **ओ. १५०** – नकुलाचा शंख सुघोष, तर सहदेवाचा मणिपुष्पक. या तिघांच्या शंखांच्या प्रचंड नादानें मृत्युदेखील गडबडला. **गजबजला**—गजबजणें–घाबरणें, धांदल उडणें. पहा—" गजबजती बाळा तेथे । येकी आंगेंसी धरिती माथें । डोळे झांकितां न झकती तेथे । पालवें वीजिती ॥ ३९० ॥—नरेंद्र, रु. स्व.

( **श्लोक १७—१८** ) या दोन श्लोकांत पांडवांच्या इतर प्रमुख वीरांनीं आपापलें शंख स्वतंत्रपणें वाजविल्याचें संजय धृतराष्ट्राला सांगतो. **ओ. १५१-द्रुपद**-द्रौपदीचा पिता, व अर्जुनादि पांडवांचा सासरा. **द्रौपदादिक**-धृष्टद्युम्नादिक धृष्टद्युम्न व शिखंडी हे द्रुपदाचे दोन पुत्र. शिखंडीच्या हातूनच भीष्माचा वध झाला. येथे काशीराजाला ' परमेष्वास ' हें विशेषण लावलें आहे, व त्यांचा अर्थ मोठें बाण व धनुष्य आहे, असा आहे. पण ज्ञानेश्वरांनीं त्याचा अनुवाद ' महाबाहु ' असा केला आहे. **ओ. १५२ अर्जुनाचा सुतु**—अभिमन्यु. यालाच मुळांत ' सौभद्र ' सुभद्रेचापुत्र असें म्हटलें आहे. **सात्यकी**—हा यादव-

वीर पांडवाकडे होता. **हान**-हन-समुच्चयार्थक अव्यय. **ओ. १५३**-विराटा- दिकांची नांवें मूळ भगवद्गीतेंत नसतांनाही ज्ञानेश्वरांनीं पांडवाकडच्या वीरांत त्याचा उल्लेख केवळ भारती कथेच्या संदर्भानेंच केला आहे. **तिहीं**-त्यानीं.

( **श्लोक १९** )—या सर्वांच्याच शंखांचा हा नाद, आकाश पृथ्वी यांना दणाणून सोडून दुर्योधनादिकांची हृदयें फोडता झाला. **ओ. १५४**-या सर्व शंखांच्या एकत्र निनादानें पृथ्वीवर सर्वत्र हाहाकार कसा उडाला, त्याचें ज्ञानेश्वरांनीं येथे केलेलें वर्णन, मुळाहून स्वतंत्र असून, ते त्यांच्या अत्युच्च प्रतिभेचें द्योतक आहे. **महाघोषनिर्घातें**—त्या मोठ्या आवाजाच्या तडाक्यानें, धक्क्यानें, या पृथ्वीला धारण करणारे आदिकूर्म व आदिशेष एकदम घाबरून जाऊन ते या पृथ्वीचा भार टाकूं पाहत आहेत, टाकण्याच्या बेतांत आहेत. **शेषकूर्म** ही पृथ्वी शेषानें, वासुकी नामक महासर्पानें, आपल्या फणेवर धरली आहे अशी समजूत आहे. त्या- प्रमाणें, मागें देवदानवांनीं मंदर पर्वताची रवी करून समुद्रमंथन केलें त्यावेळीं, ही मंदरपर्वताची रवी भगवंतांनीं कूर्मावतार घेऊन आपल्या कठिण पाठीवर स्थिर केली. अशारितीनें आदिकूर्म हा पृथ्वीला धारण करणारा झाला. पण हे आदिकूर्म व आदिशेष, जे कशानेही गडबडून जाणारे नाहींत, ते देखील या शंखाच्या आवाजानें गडबडले असें म्हटलें, यावरून त्या आवाजाची तीव्रता स्पष्ट होते. या १५४-१५८ ओव्यांतलि सर्व वर्णनांत अतिशयोक्ति अलंकारानें शंखांच्या आवाजाची असह्यता ज्ञानेश्वरांनीं फारच परिणामकारक रितीनें व्यक्त केली आहे. **गजबजौनि**-घाबरून. पहा मागें ओ. १५०. **भारातें**-पृथ्वीचा भार, ओझें. **ओ. १५५—तिन्हीलोक**-स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे तीन लोक. डळमळले. **डंडलित**-डळमळित झाले, डळमळले, हलले. **मेरुमंदार**-हे दोन पर्वत. या सुस्थिर पर्वतांना देखील झोके बसले, तेही हालले. पर्वतांना देखील झोके देणारा हा शंखांचा आवाज केवढा मोठा असला पाहिजे ! **आंदोलणें**-झोके घेणें, इतस्ततः हालणें. **समुद्रजल इ.**-त्या आवाजाचा एवढा धक्का समुद्राला बसला कीं, त्याचे पाणी आकाशापर्यंत वर उसळलें ! जेवढ्यांचा म्हणून अचल, सुस्थिर, गंभीर असा आजपर्यंत लौकिक होता, तेवढें सर्व या आवाजानें डळमळून गेले. **वेन्ही**-पर्यंत. पहा-' पुष्यातें ह्मणें उगें । नावेक वेन्हीं॥१८८॥-भास्कर, उद्धवगीता **ओ. १५६**-पुढे आणखी या आवाजाचा परिणाम वर्णन करतात. **डळंडो पांत-**

सर्व पृथ्वीतल उलथूं पाहत होतें. **उलंडणें**—उलथणें. **अडवरत**-भीत आकाशाला भय प्राप्त झाल्याकारणानें, तेथील नक्षत्रांची पखरण झाली. सर्व नक्षत्रें गळून खालीं पडलीं. **रासौभा**-पखरण. हा अर्थ राजवाड्यांनीं दिला आहे. येथे " रासौभा " याऐवजीं ' सडा ' हा पाठ इतर प्रतींत दिला आहे, पण तो निःसंशय अर्वाचीन आहे. तथापि ' रासौभा ' असा शब्द महानुभावी वाङ्मयांत मला कोठें सांपडला नाहीं. **ओ. १५७-सत्यलोक**-हा ब्रह्मदेवाचा लोक असून येथे देवांची वसती आहे. पांडवसैन्यांतील वीरांच्या शंखांचा आवाज सत्यलोकाला जाऊन तेथे देवांना अशी दहशत बसल्यामुळें, " अरे आतां सर्व सृष्टि नष्ट पावणार व सर्व देवांना येथून स्थानत्याग करावा लागणार " अशी त्यांनी एकच हाकाटी केली. **एकताळी पीटली**-सर्वांनीं एकदम टाळी वाजविली, टाळी वाजवून घोषणा केली. **मोकळवांदी**—मोकळवादी=स्थानत्याग. देवांना वाटलें कीं आतां आपल्याला हा सत्यलोक मोकळा करून द्यावा लागणार !

**ओ. १५८**—दिवसाच सूर्य गुप्त झाला. **थोकणें**—गुप्त होणें. सूर्य नाहींसा होऊन दिवसाच सर्वत्र अंधार पडला, हा रा. हर्ष्यांनीं सुचविलेला अर्थ येथे ग्राह्य आहे. त्या शंखांच्या आवाजानें दिवसादेखील सूर्य दिसेनासा झाला. **दिन**-सूर्य. **जैसा इ**०–जणू काय प्रलयदीप मालवला असेंच वाटलें. पृथ्वीप्रलय होतांना लागलेला अग्नि एकदम विझून सर्वत्र अंधार पडावा, तसें त्या आवाजानें सर्वत्र झालें तिन्ही लोकांत असा हाहाकार उडाला ! **ओ. १५९**- या झालेल्या हाहाकारानें आदिपुरुष, नारायणाला देखील आश्चर्य वाटलें. होऊं नये तें कसें झालें, याबद्दल विस्मय वाटला, व या तीन लोकांचा अंत न व्हावा म्हणून ही गडबड त्यानें थांबविली. **झने होये**–होऊं नये. ही शंखांच्या आवाजानें होणारी भीतिग्रस्त परिस्थिति अशीच चालू राहिल्यास तीन्ही लोकांचा अंत होणार हे निश्चित. म्हणून तो होऊ नये यासाठीं त्या आदिपुरुषानें हा कोलाहल थांबविला. **ओ. १६०**-आणि म्हणुनच हें जग टिकलें. **संवरलें**-नाशापासून सावरलें, **येऱ्हावि इ०**–नाहींतर जेव्हां श्रीकृष्णादिकांनीं आपले महाशंख वाजविले, त्यावेळीं युगांतच ओढवला असता, सर्व विश्वाचा नाशच झाला असता. **ओ. १६१**- तो शंखांचा घोष जरी संपला, तरी त्याचा पडसाद

पुढें पुष्कळ वेळपर्यंत होत राहिलाच. त्या पदसादानें कौरवांचा दळभार, सैन्य, नाश पावलें. **उपसंहरणें**-संपणें, थांबणें. **पडिसाद**-प्रतिध्वनि. **ओ. १६२--** ज्याप्रमाणें गजसमूहांत सिंह, हत्तींना फाडीत लीलेनें फिरतो, तसाच हा शंखांच्या नादाचा प्रतिध्वनि कौरववीरांचीं अंतकरणं भेदींत चालला. या प्रतिध्वनीनें त्यांच्या हृदयाचा थरकांप झाला. येथे प्रतिध्वनीला दिलेली सिंहाची, व वीरांच्या हृदयांना दिलेली गजघटांची उपमा ध्वनि नाहीं. ज्ञानेश्वरांनीं ती मागे. ओ. ९२ मध्यें ही योजली आहे. **लीला**--लीलेनें. **ओ. १६३**-हा गाजत असलेला प्रतिध्वनि जों ते कौरववीर ऐकत होते, तों त्यांची छाती फुटत होती. **हियें घालणें**--छाती फुटणें, काळजाचा ठाव सोडणें. **एकएकातें इ०**--' सावध रे ' असें म्हणून ते एकमेकांना धीर देत होते. **ओ. १६४--तेथ इ०**--त्यांतूनही त्या कौरववीरांत जे बळानें व प्रतिष्ठेनें परिपूर्ण असे महारथी वीर होते, त्यांनीं त्या फुटलेल्या कौरवसैन्याला पुनः आवरून धरलें. **पुरते-पूर्ण. ओ. १६५**-मग ज्यांनी सारखाच उठाव केला आहे, व पूर्वीपेक्षां दुपटीनें ज्यांनीं उचल खाल्ली आहे, त्या कौरववीरांच्या युद्धानें स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे तीन्ही लोक त्रस्त झाले. **सारिसेपणें**-सारखेच. **उठावले**--उठाव केला. **दुणावटोनि**-दुप्पटीनें चाल करून. **दंडीं**-युद्धानें. ( तृ ) **ओ. १६६**--किंवा ज्याप्रमाणें प्रलयकालचे मेघ पाण्याचा अनिवार वर्षाव करतात. तद्वतच धनुर्धररूपी ते मेघ, बाणरूपी पाण्याचा निरंतर वर्षाव करूं लागले. येथे धनुर्धरावर जलधराचे व बाणावर पाण्याचें रूपक केलें आहे. धनुर्धर व जलधर यांचे साम्य मार्मिक आहे. प्रलयकालचे मेघ जग बुडेपर्यंत अव्याहत जलवृष्टि करतात.

**(श्लोक २०)**-दुर्योधनादि कौरव तेथे जमलेले पाहून शस्त्रें उचलण्याच्या वेळीं अर्जुन आपलें धनुष्य उचलून ( श्रीकृष्णाला म्हणाला ). लढाईची सर्व तयारी होऊन आतां परस्परांवर शस्त्राघात करण्याची वेळ आली, त्यावेळचे अर्जुनाचें हें भाषण आहे. **ओ. १६७-संतोखु** इ.-तें लढाईला सज्ज झालेलें कौरवसैन्य पाहून अर्जुनाला संतोष झाल्याचें सांगितलें आहे. यावरून प्रथमतः तरी तो युद्धपराङ्मुख होता असें दिसत नाहीं. **संभ्रमें**--विस्मयानें. इतके एकत्र सज्ज झालेलें

सैन्य पाहून अर्जुनाला विस्मयही वाटला. ' संभ्रमें ' याचा अर्थ, ' सगळीकडे वळून--चक्राकार फिरून ' असा रा. हर्ष्यांनीं दिला आहे. पण याला मूळ गीतेंत आधार नाहीं. पुढील २१ व्या श्लोकांत, " दोनी सैन्यामध्यें माझा रथ उभा कर ' अशी सूचना ज्या अर्थी अर्जुनानें श्रीकृष्णाला दिली आहे, त्या अर्थी सभोंवार रथांतून फिरून येऊन अथवा कौरवसैन्याची टेहळणी करून त्यानें ही सूचना दिली असेल असें वाटत नाहीं. रणांगणावर प्रवेश करतांच आपला रथ कुठें असावा याबद्दलची ही सूचना असल्यामुळें, ती अगदी पहिलीच अशी त्याची सूचना दिसते. ' संभ्रमें ' याचा रा. हर्ष्यांनीं केलेला अर्थ म्हणूनच दूरान्वित आहे. **ओ. १६८—लीला**–लीलेनें, सहज. येथे ' कपिध्वज ' याचा यौगिक अर्थ देण्याच्या भानगडींत ज्ञानेश्वर पडलेले नाहींत.

( **श्लोक २१** )-संजय धृतराष्ट्राला सांगतो, " हे राजा ! ' माझा रथ दोनी सैन्यामध्यें हे अच्युता ! उभा कर ' असें अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला. " या श्लोकावरून देखील अर्जुनाची लढण्याची तयारी होती असेंच दिसून येतें. **ओ. १६९--रथु पेलावा**–माझा रथ लवकर दामट, पुढें लोट, ढकल. **पेलणें**– दामटणें, पुढें लोटणें. पहा- " चतुर सारथिये रथ पेलिला--" नागेश, सीतास्व. रथाच्या पुढें दामटण्यास ' पेलणे ' हा शब्द प्राचीन वाङ्मयांत योजलेला आढळतो. त्यामुळें ' प्रेरावा ' हा सिध्दनाथप्रतीचा पाठ अर्वाचीन दिसतो. **घालावा**--दोनी सैन्यामध्यें नेऊन ठेवावा. ' स्थापय ' याचा अनुवाद ' नेऊनि घालावा ' असा ज्ञानेश्वरांनीं केला आहे.

( **श्लोक** ) २२–" तोपर्यंत रणांगणावर युध्दाच्या इच्छेनें आलेल्याचें मी बारकाईनें निरिक्षण करीन. कारण या युध्दांत मला कुणाशीं लढायचं आहे तें पाहिलें पाहिजे. " आपणाला कुणाशीं युध्द करायचं आहे हें पाहण्याची बुद्धि अर्जुनाला झाली, हेंच त्याच्या पुढील विषादाचें मूळ आहे **ओ. १७०-- जंव**-- तोंपर्यंत. श्रीकृष्ण दोन सैन्यामध्यें रथ उभा करीपर्यंत. अर्जुन हें निरीक्षण आपल्या रथांत बसूनच करीत असावा. **नावेक**—क्षणभर, थोडा वेळ. **अशेख**--अशेष, सर्व. **झुंझते**-झुंजणारे, युध्द करणारे. **ओ. १७१**-- रणांगणावर पुष्कळ वीर आले आहेत. पण मला कुणाशीं युध्द कर्तव्य आहे, तें मला पाहिलं

पाहिजे. सर्वांशींच कांहीं आपलं वैर नाहीं, ज्यांच्याशीं आहे, ते कोण कोण आले आहेत तें पाहिलें पाहिजे, असं अर्जुनाचं एकंदरीनं म्हणणं.

( **श्लोक २३** )—" या युध्दांत दुष्ट दुर्योधनाचें हित करण्याच्या इच्छेनें कोण कोण लढवय्ये त्या रणांगणावर आले होते, तेच अर्जुनाला पाहावयाचे आहेत. यावरून शत्रुकडील अगदीं त्याच्या पुढ्यांतले कोण कोण आहेत, त्यांचेंच निरीक्षण तो करणारसें दिसतें. **ओ. १७२**–पण " कौरव हे बहुधा उतावळे आहेत व अंगांत सामर्थ्य नसून देखील युध्दाची भलतीच हांव ते मनांत धरतात, " हा जो निष्कर्ष अर्जुनानें काढल्याचें ज्ञानेश्वर वर्णन करतात, त्याला मूळ गीतेच्या श्लोकांत आधार नाहीं. तथापि ' कैर्मयासह योद्धव्यं ' याच्या अनुसंधानानें ज्ञानेश्वरांनीं ही व पुढील ओवी लिहिली असावी. ज्यांच्यांत सामर्थ्य नाहीं, पण युद्धाची हांव मात्र भरपूर आहे, अशा दुष्ट कौरवाशीं आपणास युद्ध कर्तव्य नाहीं, असेंच या व पुढील ओवीवरून अर्जुनाला ध्वनित करावयाचें आहे, असा ज्ञानेश्वरांनीं निष्कर्ष काढला आहे. **वांठिव**—पराक्रम. पहा–' या कारणें उध्दव देवा ! । सत्त्वाचिया वांठिवा । रजोगुणु जिणावा । भलेतिया परी ' ॥ ७६६ ॥–भास्कर, उध्दवगीता. **झुंजीं**–युध्दीं. **ओ. १७३**–युध्दाबद्दल हौस धरणारे, पण प्रत्यक्ष युध्दांत शेवटपर्यंत टिकाव न धरणारे असे जे पळपुटे कौरववीर, त्यांशीं अर्जुनाला कांहीं कर्तव्य नव्हतें, म्हणूनच आपणाला कुणाशी युध्द करायचं आहे, याची त्यानें पृच्छा आरंभिली, हा या श्लोकाचा भाव, ज्ञानेश्वरांनीं मार्मिकपणें अभिव्यक्त केला आहे. पण यांत ' दुर्बुध्देः ' हें दुर्योधनाचें विशेषण आहे. हें अनुसंधान सुटलें आहे. **थीर**–स्थिर. **रायाप्रति**--धृतराष्ट्राला. अर्जुनाचे हे कौरवाबद्दलचें सामान्य मत, धृतराष्ट्राला सांगून संजय आपलें युध्दवृत्त पुढें चालू करतो.

( **श्लोक २४** )–" अर्जुनाच्या म्हणण्याप्रमाणें श्रीकृष्ण त्याचा रथ दोनी सैन्यांच्या मध्यभागीं उभा करून म्हणाले. " **ओ. १७४–आइका**–" अर्जुन इतकें बोलल्यावर श्रीकृष्णानें त्याचा रथ दोनी सैन्यामध्यें नेला " हें वृत्त ऐका, असें संजय धृतराष्ट्राला सांगतो **पेलिला**--हा शब्द मागें ओ. १६९ मध्यें आलाच आहे.

( **श्लोक २५** )–भीष्मद्रोणांच्या व सर्व राजे लोकांच्या पुढें रथ उभा करून " अर्जुना ! हे पहा एकत्र जमलेले कौरव" असें श्रीकृष्ण म्हणाले. **ओ १७५**–

**अवचिळके**—जवळ, संनिध. पहा—" मग नागारी भीमकें । रत्नसिंहासनीं बैस- विला अवचिळके ॥ ११८ ॥- नरेंद्र, रु. स्व. **संमुख**—पुढें **ओ. १७६**—' तेथ थीरू करूनि रथु ' हें श्रीकृष्णाकडे आहे पण अर्जुनानें तो दळभार विस्मयानें पहिला, या म्हणण्याला मूळ श्लोकांत आधार नाहीं. सैन्याच्या दोन्हीं रांगांत रथ उभा केल्यावर अर्जुनानें कोणाकोणाला पाहिलें, तें पुढच्या श्लोकांत सांगितलें आहे. या श्लोकांत फक्त ' या जमलेल्या कुरूंना पहा ' एवढेंच श्रीकृष्ण म्हणाले. त्यामुळें ओ. १७७ मध्यें ' हे गोत्रगुरु देख देख ' हें जें अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला, तें ज्ञानेश्वरांनीं पुढील श्लोकाच्या अनुसंधानानें लिहिलेलें आहे. **पांतु**-पहात. **संभ्र- मेसीं**—विस्मयानें. येथे तृतीयेचे दोन प्रत्यय लागलेले आहेत. ' संभ्रम ' हा शब्द मागें ओ. १६७ मध्यें आला आहे. **ओ. १७७-गोत्रगुरु**-आमच्या कुलांतील वडील माणसें. कौरव व पांडव हे एकाच कुलांतील होते, म्हणून भीष्मादिकांना गोत्रगुरु म्हटलें आहे. **अशेख**--सर्व. **तंव कृष्णा १०**—अर्जुनानें " हे सर्व गोत्रगुरु येथे आले आहेत पहा पहा " असें श्रीकृष्णाला म्हणतांना, श्रीकृष्णालाहीं शंका उत्पन्न झाली. रणांगणावर लढण्यास आलेल्या अर्जुनासारख्या वीराच्या मनांत शत्रुसैन्यांतील वडीलमाणसांचा विचार यावा, याचें श्रीकृष्णाला आश्चर्य वाटणें साहजिकच होतें. **ओ. १७८**—श्रीकृष्ण आपल्याशींच विचार करूं लागला. अर्जु- नानें हें काय मनांत आणलें आहे ? असें त्याला वाटलें. तथापि अर्जुनाच्या मनांत कांहीं तरी विशेष असलें पाहिजे, अशी खूणगांठ श्रीकृष्णानें बांधली. श्रीकृष्णाच्या मनांत अर्जुनाबद्दल आलेली शंका, ज्ञानेश्वरांच्या कल्पकतेचा भाग असून तो मुळांहून स्वतंत्र आहे. **ओ. १७९**— याप्रमाणें श्रीकृष्णानें अर्जुनाबद्दल पुढील अनुमान बांधलें. **हे घेणें**—अनुमान बांधणें. अर्जुनाच्या मनांत अशी कांहीं चलबिचल झाली आहे, याचें अनुमान त्यानें अगोदरच बांधून टाकलें होतें. कारण श्रीकृष्ण हा परमात्मा असल्यानें, तो दुसऱ्याचें मनोगत सहजच जाणणारा होता. अर्जुनाला रणांगणावर विषाद उत्पन्न होणार, हें श्रीकृष्णानें पूर्वीच जाणलें होतें. पण या वेळेस तो कांहीं न करतां उगीच राहिला. **हृदयस्थु**—मनोगत. भक्ताचें मनोगत जाणण्याचा परमेश्वराचा हा स्वभाव ज्ञानेश्वरांनीं येथे भक्तिभावानें व्यक्त केला आहे.

( **श्लोक २६** )— तेथे रणांगणावर युद्धासाठीं जमलेले आपले वडील, आजे, गुरु, मामा, बंधु, पुत्र, नातू तसेच मित्र अर्जुनानें पाहिले. **ओ. १८०**

**पितृ**— वडिलासारखे. **पितामह**—भीष्माचार्य. **गुरु**—द्रोणाचार्य हे अर्जुन, कर्ण, दुर्योधनादिकांचे धनुर्विद्येतले गुरु. **बंधु**- दुर्योधन, दुःशासन इत्यादि धृतराष्ट्राचे शंभर पुत्र, अर्जुनाचे बंधूच लागत होते. **मातुल**— शकुनि हा दुर्योधनाचा मामा व शल्य हा अर्जुनाचा मामा तेथे होताच. **ओ. १८१— कुमर**— पांडवांचे व दुर्योधनादि कौरवांचे पुत्र रणांगणावर हजर होते. **शालक**— बायकोचे भाऊ. शकुनी हा धृतराष्ट्राचा शालक तर धृष्टद्युम्न हा अर्जुनाचा शालक होय. तसं पाहायला गेलं, तर श्रीकृष्ण हा देखील अर्जुनाचा शालकच होता. **तेयामाजि**— त्या जमलेल्या लोकांत. **हान**— समुदाय-वाचक अव्यय.

( **श्लोक २७** )— त्या दोन्ही सैन्यांत असलेले आपले सासरे, मित्र, व बांधव पाहून, अर्जुन ( करुणेनें विव्हल होतसाता श्रीकृष्णांना म्हणाला. ) आपले अनेक आप्तसंबंधी अर्जुनानें त्या दोन्हीं सैन्यांत पाहिल्यावर, त्याच्या मनांत त्यांच्याबद्दल करुणा उत्पन्न होऊन त्याला पराकाष्टेचा विषाद वाटला. हे सर्व जवळचे आप्त आतां आपल्या हांतून मारले जाणार या गोष्टीचा अर्जुनाचा मनावर एक विशिष्ट परिणाम झाला. त्याला त्यांच्याबद्दल दया वाटली व तो खिन्न होउन श्रीकृष्णांना म्हणाला. आपल्या हांतून असलें हें आप्तवधाचें कृत्य घडणार हें पाहून अर्जुनाला जो उद्वेग वाटला तोच श्रीकृष्णाजवळ त्यानें पुढील श्लोकांत बोलून दाखविला. **ओ. १८२-ससुरे**- सासरे. **कुमर, पौत्र** इ.—मुलगे नातू इत्यादि. पण मागच्याच ओंवींत 'कुमरां' चा उल्लेख आला असल्यानें, येथे त्यांची पुनरुक्ति झालीसें वाटतें. **ओ. १८३**—अर्जुनाच्या विषादाचें कारण ज्ञानेश्वरांनीं येथे अधिक सूक्ष्मतेनें पण स्वतंत्रपणें वर्णिलें आहे. आपण ज्यांच्यावर पूर्वी अनेक वेळां उपकार केले आहेत, किंवा ज्यांचें आपण पूर्वी संकटकालीं रक्षण केलें होतें, अशांची गोष्ट एक वेळ सोडली, तरी जे आपल्याहून वडील अगर धाकटे आहेत, त्या सर्वांना मारण्याची आपल्यावर पाळी यावी याचेंच अर्जुनाला मोठें दुःख झालें. अर्जुन या सर्वांबद्दल दयेनें अगदीं पाझरून गेला. **ओ. १८४**—याप्रमाणें आपल्या व शत्रूंच्या अशा

दोन्ही सैन्यांतील आप्तसंबंधीं युद्धास तयार झाले आहेत, व त्यांनाच अर्जुनानें त्यावेळीं पाहिलें. **उद्यत**—तयार. **कली**—कलीला ( चतुर्थी ) युद्धार्थ.

( **श्लोक २८** )—अत्यंत दयेनें प्रेरित झालेला अर्जुन खेद पावून श्रीकृष्णाला म्हणाला, " युद्धाच्या इच्छेनें जमलेले हे आप्तबांधव पाहून ( माझीं गात्रं शिथिल होतात, तोंड कोरडं पडतं, अंगांत कापरें भरतें, व शरीरावरचे केस ताठ उभे राहतात ). " अर्जुनाची ही अवस्था, श्लोक २९ मध्यें वर्णिली आहे. **ओ. १८५- गजबज**—धांदल. पहा-ओ. १५४. अर्जुनाच्या मनांत धांदल उडाली, तो घाबरला. **आपैसी**-आपोआप. त्याच्या मनांत आपोआप कृपा उत्पन्न झाली. अर्जुन मुळचाच भावनाप्रधान असल्यानें, त्याच्याठिकाणीं असणारी दयावृत्ति रणांगणावर त्याचे आप्त जमलेले पाहून आपोआप जागृत झाली. **तेणें अपमानें १०**—त्या अपमानानें, आपला अपमान झालासें वाटून वीरवृत्ति अर्जुनापासून निघून गेली. अर्जुन हा वीर असल्यामुळें, वीरवृत्ति ही त्याची नित्याचीच वृत्ति होती. पण येथे दयावृत्तीनें ज्यावेळीं त्याच्या मनांत ठाणें दिलें, त्यावेळीं आपला अपमान झालासें पाहून, वीरवृत्तीनें अर्जुनाच्या मनांतून पाय काढला. अर्जुनाच्या मनांतील आपली स्वाभाविक जागा दयेनें घेतलेली पाहून वीरवृत्तीला आपला अपमान झालासें वाटणें क्रमप्राप्त आहे. **ओ. १८६**—अर्जुनाची मूळची वीरवृत्ति व आतां त्यांच्यांत उत्पन्न झालेली दयावृत्ति, या दोघींतील मत्सर ज्ञानेश्वरांनीं फारच काव्यमयतेनें वर्णिला आहे. येथें दिलेला दृष्टांत देखील स्त्रियांच्या मानसशास्त्राला धरूनच आहे. " ज्या स्त्रिया उत्तम कुळांतल्या असून पुनः लावण्यवती असतात, त्या आपल्या तेजस्वी किंवा मानी स्वभावामुळें, दुसऱ्या स्त्रीचें अथवा सवतीचें अस्तित्व सहन करीत नाहींत. " येथे अर्जुनाच्या मूळच्या वीरवृत्तीला त्याच्या दयावृत्तीची संवत सहन न झाल्यामुळें, त्याची वीरवृत्ति त्याला सोडून गेली असा भावार्थ, ज्ञानेश्वरांनीं वरील दृष्टांतानें फारच योजकतेनें व्यक्त केला आहे. अर्जुनाच्या मनांत दया उत्पन्न झाल्यामुळें, त्याची वीरवृत्ति त्याला सोडून गेली हीच मुख्य गोष्ट येथें सांगावयाची असून, ती ज्ञानेश्वरांनीं येथे विविध दृष्टांतांनीं पटवून दिली आहे. शिवाय वीरवृत्तीला कुलस्त्रीची उपमाहि सार्थ असून, ज्ञानेश्वरांचें सूक्ष्म समाज-

निरिक्षण त्यांत दिसल्याशिवाय राहत नाहीं. **गुणलावण्यें आथी**—गुणांनीं व सौंदर्यांनं युक्त अशी. **आणिकीतें**-दुसऱ्या स्त्रीस, संवतीस. **ओ. १८७**-वरील गोष्टीलाच आणखी दुसरा दृष्टांत देतात "नवीन आवडीच्या स्त्रीच्या भरांत कामी माणूस आपल्या बायकोला विसरून बेपर्वाईनें त्या स्त्रीलाच भ्रमिष्टाप्रमाणें अनुसरतो, तिच्या पाठीमागें लागतो." **नविये आवडेचेनि** इ.-आपणास आवडलेल्या नवीन स्त्रीच्या भरांत. **निज वनिता**-धर्मपत्नी. **पाडेवीण**-पर्वेशिवाय, बेपर्वाईनें. पाड=पर्वा. पद्य—'मी प्रमें धाकडु । म्हणौनि मज नाहीं कव्हणांचा पाडु'॥१६३॥ भास्कर, उद्धवगीता. **भ्रमला जैसा**-एखाद्या भ्रमिष्ट माणसाप्रमाणें. भ्रमिष्ट माणूस जसा एकवल्ली असतो, एकाच्याच पाठीमागें लागतो, तद्वतच कामी, विषयांध माणूस देखील सारासार विचार न करतां, आपल्या धर्मपत्नीला सोडून आपल्या आवडीच्या नवीन स्त्रीवर अनुरक्त होतो. अर्जुनाची स्थितीही अशीच या कामी माणसासारखी झाली. त्यानें देखील आपल्या धर्मपत्नीसारखी असणारी आपली मूळची वीरवृत्ति सोडून, आपल्या आवडीची अशी नवी दयावृत्ति अंगिकारली. अर्जुनानें अशी एकदम आपली मूळची वीरवृत्ति सोडून दयावृत्ति धारण करणें हें कांहीं श्लाघ्य नव्हतें, हा अभिप्राय ज्ञानेश्वरांनीं कामुकानिंदेच्या दृष्टांतानें फारच कौशल्यानें स्पष्ट केला आहे. या व मागील ओवींतील दृष्टांतांवरून ज्ञानेश्वरांचें समाजनिरक्षिण किती सूक्ष्म व अचूक आहे, याची चांगली साक्ष पटते. **ओ. १८८**—आणखी दृष्टांत देतात. "एखाद्याला तपोबलानें ऋद्धि प्राप्त झाली असतां, त्याची बुध्दि भ्रष्ट व्हावी, व मग त्या विरक्ताला सिध्दावस्थेचा विसर पडावा! (तसं अर्जुनाला झालं). संसार सोडून योगमार्गानें ब्रह्मसाक्षात्कार मिळविण्याच्या मार्गाला लागलेल्या योग्याला, मध्यंतरी ऋद्धी प्राप्त होतात, तो जें इच्छील तें त्याला मिळतें, व सर्व अद्भुत चमत्कार त्याला करतां येतात, पण एवढ्यावरच जर तो संतुष्ट राहिला, तर मग ज्या सिध्दीसाठीं, किंवा ब्रह्मसात्कारासाठीं त्यानें एवढें योगसाधन केलें, त्या सिद्धीचा त्याला विरस पडतो. योगमार्गांत प्रथम साधकाला सकलैश्वर्य व ऐहिक समृद्धि प्राप्त होते, पण यावरच संतुष्ट होऊन जर त्याला ब्रह्मप्राप्तीच्या आपल्या अंतिम उद्देशाचा विसर पडला, तर तो योगी संपलाच असें समजावें. सिद्धी मिळविण्याची इच्छा करण्याच्या मार्गानें ती सोडून ज्याप्रमाणें ऋद्धीवरच संतुष्ट रहावें, तसेंच वीरवृत्ति टाकून दया-

वृत्ति स्वीकारणाऱ्या अर्जुनाचे झाले. " अल्पस्य हेतोर्बहु हातुमिच्छन् विचार-मूढः प्रतिभासि मे त्वम् " असे रघुवंशांतील सिंहाकडून संबोधला गेलेल्या दिलीपाप्रमाणेंच अर्जुनाची गत झाली. **तपोबळें**— योगबलानें, योगसामर्थ्यानें. **रिद्धि**- ऐश्वर्य, ऐहिक सुखोपभोग. **भ्रंशु बुद्धी**— बुद्धीला भ्रंश पडतो. त्या साधकाची बुद्धि चळते. त्याला ही ऋद्धीच गोड वाटू लागते व पुढील सिध्दी मिळविण्याचा मार्ग मग तो सोडून देतो. **विरगतां**-त्या विरक्त योग्याला. **सिद्धि**- ब्रह्मप्राप्ति, निर्वाण. **ओ. १८९-तैसे इ०**-त्या ऋद्धीवरच संतुष्ट राहणाऱ्या योग्याप्रमाणें अर्जुनाचें झालें. **जे इ.**—ज्याअर्थी त्यानें आपल्या अंगांतील मूळचें होतें तें वीर्य बाहेर घालवून, आपलें हृदय कारुण्याच्या स्वाधीन केलें. मूळची वीरवृत्ति सोडून देऊन ज्यांच्यायोगें लढणें प्राप्त होतें, त्यांच्याबद्दल त्यानें दया-वृत्ति धारण केली. ओ.१८८ मध्यें ज्ञानेश्वरांनीं ऋद्धीमागें लागून फसणाऱ्या योग्याचा दृष्टांत देऊन त्याचा जो निषेध सूचित केला आहे, त्यावरून त्यांचें या बाबतींत मत कळण्यासारखें आहे. हटयोग हा नाथपंथीय ज्ञानेश्वरांचा जिव्हाळ्याचा विषय होता, व त्यांनीं तर क्षुल्लक ऋद्धींच्या पाठीमागें न लागतां योगमार्गानें ब्रह्मप्राप्ति करून घेतल्याचें प्रसिद्धच आहे. म्हणून ही ओवी त्यांच्या आत्मचरित्रपरच आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. **ओ. १९०**—पुनः असें पहा कीं, एकादा पंचाक्षरी अगर मांत्रिक, मंत्र म्हणतांना चरळला अगर भलतेंच बडकला, तर त्याच्याच अंगांत जसें भूत संचारतें, त्यालाच जसे तें झपाटतें, त्याप्रमाणेंच अर्जुन येथे महामोहानें झपाटला गेला. पंचाक्षरी किंवा मांत्रिक वास्तविक आपल्या मंत्रबळानें दुसऱ्याच्या अंगांतलें भूत काढतो. पण त्याच्या तोंडून मंत्राचा भलताच उच्चार झाला, तर तो मांत्रिकच उलट भूताकडून झपाटला जातो. तद्वतच ज्या अर्जुनानें दुसऱ्याला धीर देऊन महामोहापासून त्याची सूटका करावी, तो अर्जुनच उलट महामोहानें घेरला गेला. अशी उलटी परिस्थिति झाली असें सांगण्याचा भाव. **बरलु जाये**—बरळूं लागला, भलतेंच भकूं लागला, मंत्राक्षरांहून दुसरंच कांहीं बोलूं लागला. पंचाक्षरी किंवा भुतें काढणारा मांत्रिक, भुतें काढण्याचें मंत्र म्हणतांना जर चुकीनें मंत्रोच्चार करूं लागला, तर त्या मंत्राचा कांहीं उपयोग होत नाहीं, उलट त्या मांत्रिकाच्या अंगांत भुताचा संचार होतो. **संचार होणें**—भूत अंगात येणें. **महामोहें**—

आपल्या आप्तसंबंधीं लोकांच्या अतीव प्रेमानें. रणांगणावर त्यांना कसें मारावें या शंकेनें. **आकालिका**— व्यापला गेला. **ओ. १९१—असता धीरु**—अर्जुन मूळचा धैर्यशाली. पण आप्तबांधवांच्या मोहानें त्याचा धीर सुटला. **हृदया-द्रावो इ०**-त्याचें हृदय दयेनें द्रवलें. पहा ' हेलावला नलपयोधि दयारसाचा -' रघुनाथ पंडित, नलदमयंतीस्वयंवराख्यान. **जैसा इ०**—ज्याप्रमाणें चंद्रकांतमणि चंद्रकिरणांनीं पाझरतो, तद्वतच अर्जुन दयेनें पाझरला. अर्जुनाला येथे दिलेली चंद्रकांताची उपमा अत्यंत सार्थ आहे. पण ज्ञानेश्वरांची ही नित्याचीच आहे. तुलनार्थ पहा— " किंवा चंद्रकांत पाझरतो । जणु शीतांगी मात्प्रिया मज आलिंगी— " दत्त, विश्वामित्रीच्या काठीं. **सीतला**— सितणें= शिवणें, स्पर्श करणें. **ओ. १९२- तिया परी**—त्या प्रकारें, त्याप्रमाणें. अर्जुन खिन्न होऊन श्रीकृष्णाला काय बोलला, तें पुढील ओवींत सांगितलें आहे. **ओ. १९३- अवधारीं**-ऐक. **मेळावा**-समुदाय, **गोत्रवर्गु**— यच्चावत् सर्व आप्तसंबंधीं मी या सैन्यसमुदायांत पाहिले. **ओ. १९४-हे संग्रामी इ०**- हे जमलेले माझे आप्तसंबंधी युध्दाला तयार झाले आहेत. **उदित**-उद्यत- तयार, सज्ज. **कीर**—खरोखर. पहा- ' हे कीर न मनी कव्हणातें । आपुलां ठाइं हांसे रायातें '—नरेंद्र, रु. स्वं, १२६. **परि आपणयां इ०**-पण आपणाला त्यांच्याशीं युध्द करणें कितपत उचित होईल ? ते आपले आप्त जरी आपल्याशीं लढायला तयार झाले, तरी आपण त्यांच्याशीं लढणें योग्य होणार नाहीं, असा अर्जुनाचा भाव. **ओ. १९५--पणे नांवें इ०**- यासंबंधीं. आपण त्यांच्याशीं युध्द करणें उचित होईल काय, यासंबंधीं मला कांहीं समजेनासें झालें आहे. **मज आपणपें इ०**— माझा मी मुळींच राहिलेलो नाहीं. I am not myself. **आपणपें**-आपणाजवळ. **मनो बुद्धि इ०**— मन व बुध्दि आपापल्या ठिकाणीं स्थिर नाहींत. **थीरू न्हवे**-स्थिर नाहींत. " येणें नांवें " हा शब्द प्रयोग ' या विषयीं, ' ' या बाबतींत ' या अर्थी ओ. २०६ मध्येंही पुढें आला आहे.

(**श्लोक २९**)-रणांगणावर आपले स्वजन जमलेले पाहून दयार्द्र झालेला अर्जुन, आपली कशी अवस्था झाली आहे, याचें वर्णन करतो. सर्व गात्रें शिथिल

होणें, तोंडाला कोरड पडणें, अंगांत कांपरें भरणें, व शरीरावर कांटा येणें हीं वास्तविक अष्ट सात्विक भावांपैकींच कांहीं लक्षणें आहेत. अर्जुनासारख्या वीरालाही त्यांचा अनुभव यावा, यावरून त्याचा भावनाप्रधान स्वभाव स्पष्ट होतो. **ओ. १९६-उपजत**-उत्पन्न होते. अर्जुनाचें सर्वांग गळल्याप्रमाणें झालें. **ओ. १९७-कांटाळा**-कांटा, शहारे. पहा—' परि अंगीं कांटाळा न फुटे । हिमोदकें दामति ना बोटें ॥ ५७२ ॥—नरेंद्र, रु. स्व. **अति संतापु इ.**—मनाला फार त्रास झाला. **तेणे इ.**—असा मनाला त्रास झाल्यामुळें, गांडीव धनुष्याला घातलेला अर्जुनाचा हात लुला पडला. **विव्हलु गेला**—विव्हल झाला, कमकुवत झाला. अर्जुन प्रथम आपलें गांडीव धनुष्य वर उचलून लढाईला तयार झाला होता, हें " धनुरुद्यम्य पांडवः " या मागलि वर्णनावरून दिसून येतें. तोच धनुष्याला घातलेला त्याचा हात, आतां त्याच्या मनांत स्वजनाबद्दल दया उत्पन्न झाल्यामुळें गळला, हें ज्ञानेश्वरांनीं विरोधानें व्यक्त केलें आहे. **गेला**—गांडीव धनुष्याला घातलेला हात, एकदम कमकुवत होऊन पडला. अकस्मात् ही गोष्ट घडून आली, इतका ध्वन्यर्थ, ' गेला ' या शब्दांत आहे. **गांडिव**—अर्जुनाच्या धनुष्याचें नांव.

( **श्लोक ३०** )—अर्जुन येथे आपली अवस्था आणखी वर्णन करून सांगत आहे. " हातांतून गांडीव धनुष्य गळून पडत आहे, सर्वांगाची लाही होत आहे, व मन भ्रमण करीत असून, आतां मला येथे क्षणभरही राहणें शक्य नाहीं. " **ओ. १९८—तें न धरत इ०**—माझें धनुष्य मला आवरत नाहीं, तें हातांतून खालीं निसटून पडत आहे. **धरणें**—आवरणें. पहा- ' देवी निगालि राजभुवना । सर्वेचि आंग धरेचि ना ॥ १८२ ॥—नरेंद्र, रु. स्व. **परि नेणेचि इ०**— तें हातांतून खालीं पडलेलें देखील त्याला समजलें नाहीं. त्याचं मन स्वजन-प्रेमाच्या मोहानं इतकं व्यापलं होतं कीं, हातांतून धनुष्य खालीं केव्हां निसटलं, तें सुद्धा त्याला कळलं नाहीं. **ओ. १९९**—या ओवींत स्नेहबलाची महति वर्णन केली आहे. " *स्नेहाचा, प्रेमाचा चमत्कार असा कीं, तें वज्रापेक्षांही कठिण, परिणामकारक व दुर्दमनीय आहे.* **वज्र**—इंद्राचें आयुध. हें अत्यंत कठिण असून पर्वतांचाही चक्काचूर करणारें म्हणून कठिणपणांत उपमेय होऊन बसलें आहे. हें वज्र देखील कदाचित् तोडतां येईल, पण हें स्नेहबंधन मानवाला कदापि तोडतां याव-

याचें नाहीं. अर्जुन याच स्नेहबंधनांत गुरफटला गेला. रणांगणावर जमलेले आपले आप्त, इष्ट, सोयरेधायरे पाहून त्यांच्याबद्दल त्याच्या मनांत अतीव प्रेम उत्पन्न झालें. तें प्रेम बाजूला सारून निघृणपणानें त्या सर्व बांधवावर शस्त्र उचलणें अर्जुनाला केवळ अशक्य झालें, व त्यामुळें या रणांगणावर क्षणभर राहण्यासही त्याचें मन घेईना. ओं. २००- " ज्या अर्जुनानें युध्दांत प्रत्यक्ष शंकराला जिंकलें. ज्यानें कृतांताला, मृत्यूला देखील अंकित केला, तो अर्जुन एका क्षणांत मोहानें घेरला गेला ! ". ज्या अर्जुनाचा प्रताप अशा प्रकारचा थोर, त्याच्यावर मोहाचा प्रभाव चालावा, हा महान् विरोध होय. पण ही अघटित घटना केवळ स्नेहानें घडून आली, हें वर सांगण्यांत आलेंच आहे. स्नेहाचें बंधन इतकें प्रबळ आहे कीं, त्याच्यापुढें मी मी म्हणणाऱ्यांचेंही कांहीं चालत नाहीं. अर्जुनाच्या मनांत आप्तस्नेह उत्पन्न झाल्यामुळें, त्याचें मूळचें शौर्य मावळलें असा भाव. शंकरु रणीं- किरातार्जुनीय युध्दाचा यांत उल्लेख आहे. एकदा अर्जुनानें एका डुकराची शिकार केली असतां, तो डुकर कोणाचा याबद्दल अर्जुन व किरातवेषधारी शंकर यांमध्यें तंटा लागून अर्जुन व किरातवेषधारी शंकर यांच्यामध्यें युध्द झालें. त्यांत अर्जुनानें शंकराचा पराभव केला. शंकरांनीं वास्तविक अर्जुनाची परीक्षा पाहण्यासाठींच किरातवेष घेतला होता. पुढें युद्धांत अर्जुनानें दाखविलेल्या शौर्याबद्दल प्रसन्न होऊन शंकरांनीं त्याला पाशुपतास्त्र दिलें. आंकणा घालणें— आंकणा=पायांतील अलंकार. यावर जित व्यक्तींचीं चित्रें रेखाटलेलीं असतात. अर्जुनानें कृतांताचीं चित्रें आपल्या पायांतील अलंकारावर रेखाटलीं होतीं. याचा अर्थ असा कीं, अर्जुनानें कृतांताला, मृत्यूलाही जिंकला होता. प्रत्यक्ष यमालाही तो भारी होता असा भाव. जिंकलेल्या शत्रूंचीं चित्रें पायांतील अलंकारावर काढून आपला प्रताप मिरविण्याची चाल पूर्वीं होती, व तिला अनुसरूनच ' तोडरीं घालणें ' असे वाक्प्रयोग महानुभावी वाङ्मयांत आढळतात. येथे देखील ' आंकणा ' याचा वर दिलेला अर्थ महानुभावी वाङ्मयांत रूढ आहे. पहा—" अभीर कार्तिकाचा रोहितकु । जेणें पेजा सांडविला मृगांकु । मेरू मंडळीं बहुधान्यकु । जयाचां काळु आंकणा " ॥ २८२ ॥- नरेंद्र; रु स्व. यावरून ' कृतांतु आंकणा घातला ' हाच पाठ मूळचा असला

पाहिजे असें वाटतें. 'तिवातकवचाचा ठावो फेडिला' हा जो पाठ इतर प्रतींत दिला आहे, तो निःसंशय अर्वाचीन आहे. कारण हाच दाखला ज्ञानेश्वरांनीं पुढें दुसऱ्या अध्यायाच्या दहाव्या ओवींत योजला असल्यानें, तोच प्रथमाध्यायांत योजून पुनरुक्तीचा दोष ते पत्करतील हें संभवनीय दिसत नाहीं. **मोहें कवळिला**–मोहानें व्यापला. **ओ. २०१**–स्नेहबंधनाचें दुर्दम्यत्व वर्णन करतांना, ज्ञानेश्वरांनीं कमलकोशांत कोंडला जाणाऱ्या भ्रमराचा जो दृष्टांत दिला आहे, तो जितका मार्मिक तितकाच काव्यमय आहे. "भ्रमर कसलेंही कठिण लाकूड सहज पोखरून फोडतो, पण कमलाच्या कोमल कोशांत तो सांपडला असतां, ( तो कमलकोश चिरून बाहेर पडणें त्याला शक्य होत नाहीं. ) हीच कल्पना

**बंधनानि खलु सांति बहूनि । प्रेमबंधनमतीव विचित्रम् ।**
**दारुभेदनिपुणो हि षडंघ्रिः । निष्क्रियो भवति पंकजकोशे ॥**

या संस्कृत सुभाषिताशीं समानार्थक असल्याचें रा. आगाशे यांनीं सांगितलें असून, हें संस्कृत सुभाषितच मुळीं ज्ञानेश्वरांच्या वरील ओवीवरून कोणा ज्ञानेश्वरीवाचकानें रचलें असावें, असा त्यांनीं तर्क केला आहे. पण हें सुभाषित केव्हां रचलें गेलें, ज्ञानेश्वरीच्या पूर्वीही त्याचें अस्तित्व कोठें सांपडतें काय ? या प्रश्नांचा निर्णय लागल्याशिवाय कोण कोणाचा ऋणी आहे, हें समजणें कठिण आहे. **कोडें**–सहज. पहा–' प्रभू अंतरौनि कोडें । जे जे केले पवाडे'॥११६॥–नरेंद्र, रु. स्व. **भलतैसें**-वाटेल तें. **कमळिकेमाजि**-कमलाच्या कोशांत. भ्रमर कमलांतील मध चाखण्यासाठीं कोशांत शिरतो, इतक्यांत सूर्य अस्ताला जाऊन कमल मिटल्यामुळें, तो आंत कोंडला जातो, व त्याला सकाळीं सूर्योदयापर्यंत बाहेर पडतां येत नाहीं. एवढा लाकडें पोखरणारा भ्रमर, पण त्याला कोमल कमलाचा कोश पोखरतां येत नाहीं, याचें कारण असें कीं भ्रमर त्या कमलाच्या स्नेहबंधनांत सांपडतो. भ्रमराचें त्या कमलावर अतीव प्रेम असल्यामुळें, कमलाला चिरून आपली सुटका करून घेण्याची कल्पना, त्याच्या मनाला शिवत नाहीं. अर्जुनाचेंही असेंच झालें. रणांगणावर जमलेल्या आपल्या आप्तांबद्दल त्याच्या मनांत दया उत्पन्न झाल्यानें, ती बाजूला सारून त्यांच्याबरोबर युद्ध करणें त्याला अशक्य झालें. आप्तांचें स्नेहबंधन तोडून त्यांच्याशीं कठोर होणें त्याच्या

जिवावर आलें. **ओ. २०२**— कमलकोशांत कोंडलेला भ्रमर आपला प्राण देणें पत्करतो, पण तें कमळदल चिरण्याचें तो मनांतही आणीत नाहीं. असें हें स्नेहबंधन कोमलपणामुळेंच मोठें कठिण झालेलें असतें. किंबहुना हें स्नेहबंधन जितकें कोमल आहे, तितकेंच तें तोडणें कठिण आहे. **प्राणें उत्तीर्ण होणें**—मरण. **ओ. २०३**—हें स्नेहबंधन, ही आदिपुरुषाची, परमात्म्याची माया आहे. परमात्म्याच्या मायेचा हा खेळ आहे. परब्रह्म आपल्या मायेनें ही स्नेहबंधनासारखीं बंधनें निर्माण करतें. **ब्रह्मेयाहीं** इ.—ही परमात्म्याची माया ब्रह्मदेवाच्याही आटोक्यांत येत नाहीं. ब्रह्मा, विष्णु, महेश, हे देखील त्या परमात्म्याच्या मायेपासूनच उत्पन्न झाले असल्यानें, ती ब्रह्मदेवाच्या आवांक्या बाहेरची आहे, असें म्हटलें आहे. **आया**—आटोक्यांत. अशा मायेच्या फेऱ्यांत अर्जुन सांपडला आहे. **भुलविला**—परब्रह्माच्या मायेनें फसविला गेला. **राया**—हे धृतराष्ट्रा ! **ओ. २०४**-**अभिमानु**—आत्मिक भावना. आपले सर्व स्वजन, आप्त, इष्ट, बंधु, मित्र, सोयरे धायरे, त्या रणांगणावर जमलेले पाहून अर्जुनाची युद्धाबद्दलची आत्मीयता नष्ट झाली. हें युद्ध आपण जिंकलें पाहिजे ही त्याच्या मनांतील आत्मिकभावना पार मावळून गेली. या व पुढील ओवींतील मजकूर संजय धृतराष्ट्राला सांगत आहे. **ओ. २०५**—संजय म्हणतो, "अर्जुनाच्या मनांत ही सदयता कशी उत्पन्न झाली कोणास ठाऊक !" **मग** इ.—मग अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला, "येथें या रणांगणावर आतां नसलेलेंच बरें ! येथून जावें हेंच उत्तम !" **ओ. २०६**—अर्जुन श्रीकृष्णाला आपली अवस्था सांगतो. **जे वधावे** इ.—"हे सर्व जमलेले माझे गोत्रज आतां लढाईत मला मारावे लागणार, या गोष्टीनें माझें मन अतिशय व्याकूळ होत असून माझी वाचा असंबद्ध होत आहे. मनुष्य भावनाप्रधान झाला म्हणजे त्याच्या मागच्यापुढच्या बोलण्यांत मेळ राहत नाहीं, तसेंच अर्जुनाचें झालें. **बरळ**—असंबद्ध. पहा मागें. ओ. १९०, तेथे हा शब्द क्रियापद आहे. **पणें नावें**-यामुळें, या गोष्टीनें. हा शब्दप्रयोग ज्ञानेश्वरींत अनेक वेळा येतो. पहा मागें, ओ. १९५. त्यावरून 'येणे मानें' इत्यादि पाठभेद चुकीचे ठरतात.

**(श्लोक ३१)**·अर्जुन श्रीकृष्णाला म्हणतो-" लक्षणें तर मला विपरीत दिसतात, व युद्धांत स्वजनांना मारून मोठसें कल्याण होईल असें मला तरी दिसत नाहीं "

या श्लोकावर टीका करतांना ज्ञानेश्वरांनीं अर्जुनाला कोणती विपरीत लक्षणें दिसलीं त्याचें विवरण न करतां, ' स्वजन ' या शब्दावरच अधिक जोर दिला आहे. **ओ. २०७**—कौरवांना जर जिवायचें, तर युधिष्ठिरादिक पांडवांना कां नाहीं? दोघेही स्वजनच आहेत, अशी शंका अर्जुनानें येथे घेतली आहे. पण हा भावार्थ मूळ श्लोकांत नाहीं. स्वजनच जर मारायचे तर कौरव तेवढेच घेऊन पांडव कां सोडायचे, अशी समत्वबुद्धि अर्जुनाची यावेंळीं झाली असेल असें वाटत नाहीं. अर्जुनाच्या मनांत सर्वच स्वजनाबद्दल दया उत्पन्न झाली असल्यानें, तो कौरवांना जेथे मारायला तयार नव्हता, तेथे तो ' युधिष्ठिरादिक पांडवांना तरी मग कां सोडायचं ' असं म्हणेल, हें संभवनीय दिसत नाहीं. **वरिवावे**–हें क्रियापद, ' वरिव ' या शब्दापासून झालें असावें. वरिव=श्रेष्ठपणा, या अर्थी महानुभाव वाङ्मयांत हा शब्द आला आहे. पहा–' रूप रत्नांतें घे वरिवं । देखौनि पशुपक्षियें होति लेपिवं ' ॥ ३३३ ॥–नरेंद्र, रु. स्व. " कौरवावरच जर श्रेष्ठपणा मिरवावयाचा, त्यांच्यावरच जर चालून जावयाचें, तर युधिष्ठिरादिक पांडव कां घ्यायचे नाहींत ? " असा या ओवीचा अर्थ होईल. ' वरिवावे ' हा शब्द दुर्मिळ आहे. पण याऐवजीं ' जरी वधावें, ' ' जैं वधावे ' असे जे पाठ इतर प्रतींत आढळतात, ते मात्र अर्वाचीन असावे. **हे येरयेरें**—हे सर्व परस्परांत आपापसांत आमचे भाऊबंदच आहेत. **येरयेरें**-परस्पर, पहा मागें. ओ ८७. **ओ. २०८**–म्हणून हें युद्ध जळो. **प्रत्यया** इ०-माझ्या तें मनाला येत नाहीं. मला तें पटत नाहीं. **पणे** इ०—या युध्दाच्या महापापानें आमचें अडलय काय ? या युध्दांचं महापाप करण्याचं आम्हाला काय कारण ? **महापापें**—या युद्धांत आपल्याकडून स्वजनहत्या घडणार म्हणजे आपल्या हातून महापातकच घडणार अशी अर्जुनाची समजूत आहे. **ओ. २०९**–अर्जुन म्हणतो, " देवा ! सर्व तऱ्हेनं पाहिलं, तरी युध्द करण्यांत आमचें वाईटच होणार आहे. उलट हे युध्द टाळल्यास, झाला तर आमचा लाभच होईल. " **बहुतां परी**—अनेकप्रकारें. **ओखटें**—वाईट. **वर**–उलटपक्षीं. **चुकवितां**— हें युध्द करण्याचें टाळल्यास. **कांहीं एक**—थोडा तरी.

( **श्लोक ३२** )– ' हे कृष्णा ! मी विजयाची, राज्याची व सुखाची इच्छा करीत नाहीं. कारण हे गोविंदा ! राज्य, उपभोग अथवा जीवित असून

तरी आम्हांला त्याचा काय उपयोग ?" स्वजन नाशानें जर आपणास राज्योपभोग मिळत असेल, तर त्याशीं आपणास कांहीं कर्तव्य नाहीं असा अर्जुनाच्या म्हणण्याचा अभिप्राय आहे. **ओ. २१०—विजयवृत्ती—**( तृ ) विजयवृत्तीशीं, जेतेपणाशीं. स्वजनांना लढाईत जिंकावे या विचारसरणीशीं मला कांहींच कर्तव्य नाहीं. शिवाय स्वजनांना मारण्याचें पाप पदरीं घेऊन तें राज्य तरी काय करावयाचं ! **हें पाउनियां—** हें पाप मिळवून. स्वजनहत्येचें पाप पदरीं बांधून घेऊन मिळविलेल्या राज्याचा उपयोग तरी काय ?

( **श्लोक ३३** )—" ज्यांच्यासाठीं राज्याची, उपभोगांची व सुखाची इच्छा धरावयाची, तेच मुळीं प्राणावर व धनावर उदार होऊन युद्धाला तयार झाले आहेत. " अर्जुनाच्या मताप्रमाणें राज्य किंवा सुखोपभोग हे स्वजनसुखार्थ आहेत. पण जेथे हें राज्य व सुखोपभोग स्वजनांना मारूनच मिळवावे लागतात, तेथे तें राज्य व सुखोपभोग मिळवून स्वजनांना सुख देण्याचा हेतु कसा सिद्धीस जाणार ? **ओ. २११—**म्हणून अर्जुन म्हणतो कीं, या आप्तसंबंधीयांना मारूनच जर सुखोपभोग मिळायचे असतील तर ते जळोत ! त्याशीं मला कांहीं करावयाचें नाहीं. **ओ २१२—**" असल्या राज्योपभोगाच्या सुखाभावीं मी वाटेल तें दुःख सहन करीन, फार काय शेवटीं माझे प्राण गेले तरी बेहेत्तर ! **जें होइल—**या राज्यसुखाभावी जें दुःख माझ्यावर ओढवेल. **तें भलतें इ०**-तें मी आणखी वाटेल तें सहन करीन. **शेखीं—**शेवटीं. याहून म्हणजे, माझे जीवितही शेवटीं जाईल. गेलें तरी हरकत नाहीं. **ओ. २१३—**पण या स्वजनांचा घात करावा, त्यांची हत्या करावी, व मग आपण राज्य भोगावें, ही गोष्ट माझें मन स्वप्नांतही करूं शकणार नाहीं. ही गोष्ट करणें माझ्या ध्यानीं मनीं स्वप्नींही येणार नाहीं **ओ. २१४—**अर्जुन पुढें म्हणतो, " या वडिलांशीं जर आम्हीं वैरभाव धरला तर आम्हीं जन्मून तरी काय उपयोग व जगायचं तरी कुणासाठीं ? " वडील माणसांना सुख देण्यासाठीं मुलांचा जन्म असतो. पण उलट मुलांनींच जर वडिलांशीं वैर धरलें, तर मुलांनीं जन्मायचं तरी कशाला ? व जगायचं तरी कुणासाठीं ? कुरूक्षेत्रावर अर्जुनापेक्षां कितीतरी वडील अशीं माणसें युद्धासाठीं उभी होती. त्यांच्याबद्दल वैरभाव धरून त्यांच्यावर शस्त्र उचलण्याची दुष्ट आपत्ति अर्जुनावर ओढवल्यानें, त्याच्या तोंडून

वरील उद्गार निघाले आहेत. **जियावें**-जगावें. **विह**—वैर. **ओ. २१५**-कुळांत पुत्र उत्पन्न व्हावा अशी इच्छा केली जाते. पण त्या पुत्राकडून आपल्या कुळांतल्या लोकांचा घात व्हावा, हेंच कां त्याचें फल !" आपल्या कुळाचा वंशविस्तार वाढावा म्हणून कुळांत पुत्र व्हावा, अशी लोक आकांक्षा धरतात. पण तो पुत्रच जर कुळांतल्या लोकांना घातक ठरला, तर त्याचा काय उपयोग ? अर्जुनाचा अभिप्राय असा कीं, आपल्यासारखे पुत्र कौरवपांडवाच्या वंशविस्तारासाठीं जन्मले अशी अपेक्षा आहे. तेच जर आपल्या स्वजनांना मारून कुळच नष्ट करूं लागले, तर मग त्यांच्या जन्माचें साफल्य तें काय ? पुत्रानें कुळाचा उद्धार करायचा कीं नाश ? कुळाचा नाश करणें हेंच कां पुत्रजन्माचें फल ? **ओ. २१६**-"ही स्वजनहत्या आपण मनांत तरी कशी आणायची, आणली तरी वज्रासारख्या कठिण शब्दांनीं ती बोलून कशी दाखवावयाची, व त्यांतूनही ती हत्या जर हांतून घडलीच तर यांचं चांगलंच झालं म्हणायचं !" अर्जुनाच्या म्हणण्याचा मथितार्थ असा कीं, आपल्या आप्तस्वकीयांचा रणांत वध करावा हें आपल्याकडून कायावाचामनानें कदापि होणार नाहीं. आपल्या हातून हें महापाप घडल्यास पुढें कल्याणाची आपणास आशाच नको. रा. आगाशे यांनीं सदर ओवीचा अर्थ वरील प्रमाणें दिला असून, तो मागील संदर्भावरून पटण्यासारखा आहे. इतर टीकाकारांनीं जो अर्थ दिला आहे, तो थोडा भिन्न आहे. "आपण स्वजनांना मारण्याची वज्रासारखी कठोण भाषा जी बोलतो आहोत, ती आपण मनांत तरी कशी आणायची ? शिवाय जे हें आपण बोलतो तें जर आपल्या हांतून घडलं तर मग यांचं चांगलच झालं म्हणायचं !" हा अर्थ उत्कटतेंत थोडा कमी पडतो. "जी गोष्ट मनांतही आणूं नये, ती बोलून तरी कशी दाखविता येईल व मग ती प्रत्यक्ष हांतून घडली तर काय अनर्थ होईल !" असा काया वाचा मनाचा संबंध रा. आगाशांच्या स्पष्टीकरणांत येत असल्यानें, तें अधिक विचारार्ह आहे असें वाटतें. शिवाय पुढील ओ. २१४ मध्यें या आप्तवधासंबंधी बोलणें हें पाप असल्याचा उल्लेख आला असल्यानें, याच अर्थाला पुष्टि मिळते. **ओ. २१७** अर्जुन येथे आपला पुत्रधर्म विशद करतो. "आमच्यासारख्या पुत्रांनीं जें जें मिळवावें तें तें या वडील मंडळींनीं भोगावें." आमची सर्व मिळकत या वडिलांच्या उपभोगासाठीं आहे. असा त्याचा

म्हणण्याचा हेतु. पुत्रांनीं मिळवायचं व वडीलांनी खायचं, हाच वास्तविक पुत्रांचा धर्म. **हें जिवित** इ०- आपलें जीवित देखील या वडील माणसांच्या कामीं खर्ची घालावें. जन्मभर वडील माणसांच्या सेवेंतच लहानांनीं असणें हेंच त्यांचे कर्तव्य होय. **उपकरावें**— द्यावें, खर्ची घालावें. **काजीं यांच्या**— आपल्या स्वजनांच्या, आप्तबांधवांच्या कार्यांत. असा हा पुत्रधर्म असतां, आपल्या वडील धान्या संबंधीयावर शस्त्र उचलण्याची पाळी आपल्यावर आली, याचाच अर्जुनाला खेद वाटला. **ओ. २१८**- अर्जुन पुढें सांगतो कीं, "दशदिशांचे राजे जिंकून आपल्या आप्तांना सुख देणें हेंच आमचें कर्तव्य." **दिगंतिचे**— दशादिशांचे. राजांना जिंकून आणून त्यांच्या संपत्तीनें आपल्या आप्तवर्गाला सुख देणें, हेंच अर्जुनासारख्या प्रतापी पुत्रांचें कर्तव्य होय. आप्तांनाच उलट मारणें हा त्यांचा धर्म नव्हे असा त्याचा आशय. **विभांडणें**— जिंकणें. **ओ. २१९.**-"पण माझं नशीब असं उलट कीं, ज्या माझ्या स्वजनांना अथवा बांधवाना मी वरीलप्रमाणें सुख द्यायचं, तेच माझ्याशीं लढायला तयार झाले आहेत." अर्जुन येथे आपल्या कृतकर्माला दोष देत असल्याचें वर्णन करून, ज्ञानेश्वरांनीं, तो अधिकच भावनाविव्हल झाल्याचें सूचित केलें आहे. शिवाय ओ. २१८ व ओ. २१९ यामधील विरोध लक्षांत घेतला असतां, अर्जुनापुढें विपरीत परिस्थिती कशी उभी राहिली आहे याची कल्पना येते. **उद्यत**--तयार. **ओ. २२०**- अर्जुन यापुढें, तेथे युद्धार्थ आलेल्या आप्तवर्गाचें आणखी वर्णन करतो. "हे सर्व ( गोत्रज ) आपापल्या बायका, पोरें, धनधान्य संपत्ति टाकून आपले प्राण शस्त्रास्त्रांवर टांगून येथे आले आहेत." आपल्या संसारावर पाणी सोडून ते धारातीर्थी पतन पावण्यासाठीं येथे आहेत असें अर्जुनाचें सांगणें. अशा स्वार्थत्यागी माणसांना मारणें त्याच्या मनाला कसेंसेंच वाटतें. **अंतौरिया**-बायका, स्त्रिया. **कुमरें**- मुलें, पुत्र. **भांडारें**-खजिनें, धान्याचीं कोठारें. **जिव्हारें**-प्राण. **शस्त्रांसीं आरोपुनि**-शस्त्रास्त्रांवर टांगून. 'आरोपणें' हें 'रुह्' धातूचें प्रयोजक रूप आहे. हे सर्व आप्त, तळहातावर शिर घेऊन लढण्यास सिद्ध झाले आहेत, असा अर्जुनाच्या म्हणण्याचा हेतु. रजपुत लोक लढाईस जातांना आपल्या बायकापोरांना ठार मारून व घरेंदारें भस्मसात् करूनच घराबाहेर पडत असत. तसाच प्रकार ज्ञानेश्वरांनीं येथे वर्णिला असल्यानें, यादवकालीन युद्धनीतिचाच हा कदाचित्

प्रकार असावा. **ओ. २२१**-अर्जुनापुढें पडलेला पेंच येथे वर्णन केला आहे. अगोदर आप्त, त्यांतूनही आपल्या जिवावर उदार होऊन लढण्यास आलेले, अशांना कसें मारावें हाच अर्जुनाला प्रश्न पडला आहे. शिवाय कोणावर म्हणून शस्त्र धरायचं, कोणाला सोडायचं, ही गोष्ट देखील कांहीं कमी अवघड नव्हती. कारण तेथ असलेले सर्वच अर्जुनाचे सारखेच जवळचे आप्तसंबंधी होते. **निजहृदया** इ.—त्यांच्यावर शस्त्र उचलणें म्हणजे स्वतःच्या हृदयांतच भाला खुपसण्यासारखे अर्जुनाला वाटलें. आपण व तो आप्तवर्ग यांच्यांत कांही भेदभाव आहे, असें अर्जुनाला वाटत नसल्यानें, त्यांना मारण्यासाठीं त्यांच्यावर शस्त्र उगारणें, म्हणजे स्वतःचाच हृदयभेद करणें होय, असें त्याला वाटणें साहजिक होतें. अर्जुनाची ही आत्मीयता किती उत्कट होती, व त्यामुळें रणांगणावर युद्धाला उभा राहणें त्याला कसें कठीण वाटत होतें, या भावनेचें रेखाटन ज्ञानेश्वरांनीं फारच जिव्हाळयानें केलें आहे. वीराचा कारुण्यभावही तितक्याच तीव्र स्वरूपाचा असतो हें अर्जुनाच्या उदाहरणावरून आपणास दिसत असून, A hero is a hero at all points या कार्लाइलच्या वीराबद्दलच्या उक्तीचाही येथे उत्तम प्रत्यय येतो.

(**श्लोक ३४**)—आपल्याशीं लढावयास आलेल्या आप्तवर्गांत कोण कोण संबंधी आहेत, त्याचें तपशीलवार वर्णन अर्जुन करतो. गुरु—शिष्य, पिता—पुत्र, आजा—नातू, मामा—भाचा, सासरा-जावई, असे नित्याच्या व्यवहारांतले जे परस्पर संबंध असतात, त्या सर्वांचा येथे उल्लेख करण्यांत आला आहे. हे आप्तसंबंध जितके विविध, तितकेच ते एकदम तोडणें कठिण, असेंच येथें ध्वनित केलें आहे. **ओ. २२२-हे नेणसि** इ.—अर्जुन श्रीकृष्णास म्हणतो, "हे तुला काय ठाऊक नाहींत ?" **तरि पैल** इ०—हे पहा पलीकडे भीष्मद्रोण उभे आहेत. **जेयांचे उपकार**—अर्जुनावरच काय पण सर्वच पांडवावर भीष्मद्रोणांचे उपकार अपरिमित होते. भीष्म तर त्यांचा आजाच लागत होता व द्रोण तर बोलून चालून त्यांचा धनुर्विद्या देणारा प्रत्यक्ष गुरूच होता. अर्जुन द्रोणाचार्यांचा धनुर्विद्येतला पट्टशिष्य होता हें प्रसिद्धच आहे. म्हणूनच आपल्यावर त्यांचे असाधारण उपकार आहेत असें तो म्हणत आहे. **ओ. २२३—शालक**—मेहुणा, बायकोचा भाऊ. धृष्टद्युम्न हा द्रौपदीचा भाऊ व अर्जुनाचा शालक होता. श्रीकृष्णही सुभद्रेचा भाऊ

व अर्जुनाचा शालकच होता. **ससुरे**—सासरे द्रुपदराजा हा पांडवांचा सासरा. **मातुल**—मामे. शल्य हा पांडवांचा मामा, तसा शकुनीही कौरवांचा मामा होता. **इष्ट**—आप्तेष्ट. **ओ. २२४—आति जवळिकेचे**—अगदीं जवळचे भाऊबंद, दहा दिवसांतले. **म्हणौनि** ३०—म्हणून यांची हत्या करण्यासंबंधीं बोलणें देखील पाप आहे. मागें ओ. ११६ मध्यें या आप्तांच्या वधाची वज्रासारखी कठोरभाषा आपल्या तोंडून बोलेली जाणें शक्य नाहीं, असे अर्जुनानें सांगितलेंच आहे. **पणे नावें**—या आप्तवधा संबंधीं. हा शब्दप्रयोग याच अध्यायांत आणखी दोन वेळां मागें आला आहे. पहा ओ. १९५ व २०६. अर्जुनाच्या बोलण्याच्या आशय असा कीं, हे रणांगणावर जमलेले आप्त इतके जवळचे आहेत कीं, त्यांना मारण्याची भाषा तोंडानें बोलणें महत्पाप आहे.

( **श्लोक ३५** )–या श्लोकांत अर्जुन आपला अंतिम निर्णय श्रीकृष्णाला जाहीर करतो. “ त्रैलोक्याच्या राज्यासाठीं सुद्धां, या आम्हांला मारण्यास तयार झालेल्यांना हे मधुसूदना ! मी मारुं इच्छित नाहीं. मग पृथ्वीची गोष्ट कशाला? ” येथे त्रैलोक्यराज्यासाठीं सुद्धां आपण जी गोष्ट करायला तयार नाही, ती यःकश्चित पृथ्वीसाठी कोण करील ! असा जो विरोध गीतेंतील अर्जुनाच्या संभाषणांत व्यक्त झाला आहे, त्याचा जोर ज्ञानेश्वरांच्या विवेचनांत अगदींच लुप्त झाला आहे. ’ किं नु महीकृते ’ या पदाचें स्पष्टीकरण ज्ञानेश्वरांनीं मुळांतच सोडून दिलें असून, ‘ हे अनुचित नाचरे मी ’ असें अर्जुनाकडून कोरडें वदवून, मुळांतील त्याच्या निर्णयाची तीव्रता त्यांनीं पार घालवून टाकली आहे. **ओ. २२५**–अर्जुन म्हणतो, ‘ हे लढायला आलेले आप्त वाटेल ते करोत, आतां येथल्या इथं मला मारोत, पण यांचा घात मनानें सुद्धां मी चिंतणार नाहीं. ’ **ओ. २२६**—**अनकालित**– प्रयासरहित, अक्लेश, सहज, न करतां. **जोडैल**— प्राप्त होईल. **हे अनुचित**–हें आप्तवधाचें अनुचित कर्म मी करणार नाहीं.

( **श्लोक ३६** )–“ कौरवाना मारून हे जनार्दना ! आमचें काय चांगलें होणार ? हे आततायी असले, तरी त्यांना मारल्यानें आम्हांला पापच लागेल. ” अर्जुनाच्या म्हणणें असें कीं, घरें जाळणारे, विष घालणारे किंवा शस्त्र घेऊन

मारायला आलेले असे जे आततायी लोक असतात, त्यांना मारणं पाप नाहीं, या शास्त्रवचनाप्रमाणें आमच्यावर चालून आलेल्या या आततयी लोकांना मारणं पाप नसलं तरी ते स्वजन असल्यानें, स्वजनहत्येचं पातक आम्हांला लागेलच. अर्जुन वास्तविक येथे ' कौरवांना मारण्यांत आमचा फायदा काय ?' अशी शंका घेत असतां, ज्ञानेश्वरांनीं आपल्या विवेचनांत अर्जुनाच्या मनांत या आप्तवधाच्या पापानें श्रीकृष्णाची आपल्याबद्दल अप्रीति उत्पन्न होईल, अशी भीति निर्माण झाल्याचें वर्णन केलें आहे. ज्ञानेश्वरांचें ओ. २२७-२३२ पर्यंतचें या श्लोकावरील भाष्य अगदींच निराधार व अप्रासंगिक वाटतें. " कौरवांना मारण्यांत काय प्रेम आहे ?" असें अर्जुनाचें सर्वसाधारण म्हणणें असतां, मूळांतील ' नः का प्रीतिः ' याचा " आम्हांला तुझी प्रीति कोठून मिळेल ? " अशा अर्थाची कृष्णभक्तिपर मुरड जी त्यांनीं घातली आहे, ती येथे तरी अनाहूत आहे, यांत शंका नाहीं. कारण जो श्रीकृष्ण अर्जुनाच्या हांतून कौरव मारले जावे म्हणून त्याला रणांगणावर आणतो, तो अर्जुनाकडून त्यांची हत्या झाल्यास तें पाप होय असें मानील तरी कसें, व अर्जुनावर तो नाराज तरी काय म्हणून होईल ? स्वजनहत्येनं श्रीकृष्णाच्या रोषास आपण पात्र होऊं असें वाटण्यासारखी अर्जुनाच्या मनाची परिस्थिति मुळींच नसून, उलटपक्षीं अर्जुन रणांगणावर कौरवांना मारण्यास माघार घेत असल्याचें पाहूनच श्रीकृष्णाला त्याचा राग आला असता, अशीच वास्तविक खरी परिस्थिति होती. म्हणून " हें स्वजनहत्येचं पाप केल्यावर श्रीकृष्णा ! तुला मी तोंड तरी कसं दाखवावं " असें अर्जुनाच्या तोंडीं जे उद्गार ज्ञानेश्वरांनीं घातले आहेत, ते निराधार व वस्तुस्थितीचा विपर्यास करणारे आहेत. ' प्रीतिः ' याचा " तुझी प्रीति " असा कृष्णभक्तिपर अर्थ लावण्यांत, ज्ञानेश्वरांनीं येथे स्वतःला मान्य असणाऱ्या भक्तिमार्गाचा गौरव केला असला, तरी अर्जुनावर त्याच मताचा केलेला आरोप निदान प्रस्तुत प्रसंगीं तरी अस्थानी आहे, हें सूक्ष्म वाचकाला स्पष्टपणें दिसण्यासारखें आहे. ओ. २२७-ज्ञानेश्वरांचा अर्जुन म्हणतो, " जर माझ्याकडून हें स्वजनवधाचें पाप घडलें, तर मग मी कोणाच्या मनांत तरी राहीन काय ? माझ्याबद्दल कोणी विचार तरी करील काय ? " हें पाप घडल्यास सर्वच मला विसरतील, माझें नांव टाकतील असा भाव. सांथै ह०-" हे कृष्णा ! असं पाप करून आम्हीं तुझं तोंड तरी कसं पाहावयाचं ? तुझ्यापुढं यावयाचं तरी कसं ? पाप्यानं परमेश्वरापुढं येण्याचं

धार्ष्टर्य करणें कितपत युक्त होईल ? " **ओ. २२८**-अर्जुन पुढें म्हणता कीं, " स्वजनांचा वध करून जर मी पापाचा धनी झालों, तर हे कृष्णा ! आज आमच्या हातांत सांपडलेला असा तूं आम्हांला दुरावशील." पाप्यापासून परमेश्वर दूर जातो. म्हणून अर्जुनाचा आशय असा कीं, आज जोंपर्यंत आपल्या हातून पाप घडलं नाहीं, तोंपर्यंत परमेश्वर आपल्या मुठींत आहे. पण हेंच जर स्वजनहत्येचें पाप आपल्याकडून घडलं, तर परमेश्वर ( कृष्ण ) आपल्याला खास दुरावेल. पण ज्ञानेश्वरांच्या अर्जुनाचं हें म्हणणं तितकसं युक्त नाहीं याचं विवेचन वर आलंच आहे. **वसैठा**—वस्तीचें ठिकाण. **जोडिलासि**—जोडलेला असा, ( भूतकालवाचक धातूचा पूर्णभूतकालवाचक उपयोग ), प्राप्त झालेला असा. **हातिचा**—हातांत असलेला, स्वाधीन असलेला. **दूरि होणें**—दुरावणें, पारखा होणें. **ओ. २२९**—" कुलाचा नाश करणारीं बहुतेक पातकें ज्यावेळीं माणसाच्या अंगांत शिरतात, त्यावेळीं तुझें दर्शन कोणाला कोठें होणार ? " अर्जुनाचा अभिप्राय असा कीं, आपल्याकडून आपल्या कुलाचा विध्वंस करणारें स्वजनवधाचं पातक झाल्यावर, मग आपल्यास कृष्णाचें अथवा परमेश्वराचें दर्शन दुर्लभच होणार ! निष्पाप व निष्कलंक अशा भक्तासच परमेश्वर दर्शन देतो, या न्यायानें पाहिल्यास, कौरवहत्येचं पाप डोकीवर घेतल्यानंतर श्रीकृष्ण आपणास दर्शन देणार नाहीं, तो आपलें तोंडही पाहणार नाहीं, अशी अर्जुनाला भीति वाटते. **कुलहरणी**—कुलाचा नाश करणारीं. **अंगीं जडतीं**—अंगाला चिकटतील. **ओ. २३०** – पापी माणसापासून परमेश्वर कसा दूर जातो, तें ज्ञानेश्वरांनीं नेहमीं प्रमाणेंच एकदोन दृष्टांतांनीं स्पष्ट केलें आहे. " एखाद्या सुंदर उद्यानाला वणवा लागला असता, तेथें कोकिल एक क्षणभर देखील राहत नाहीं." त्याप्रमाणें पापानं घेरलेल्या माणसापासून परमेश्वर लांब जातो. त्याच्या ठिकाणीं क्षणभर सुद्धां तो राहत नाहीं. **अनलु**—अग्नि. **संचरला**-फैलावला. **ओ. २३१**—दुसरा दृष्टांत देतात. " किंवा चिखलानं भरलेलं सरोवर पाहून चकोर पक्षी तेथें न राहतां, तें सरोवर सोडून निघून जातो. " मागील व या ओवींत परमेश्वराला अनुक्रमें कोकिल व चकोर यांची उपमा दिली असून, पापी माणसाला अनुक्रमें वणवा लागलेल्या उद्यानाची व सकर्दम सरोवराची उपमा योजली आहे. चकोर म्हटला कीं, तेथे चांदण्याचा संबंध असावयाचाच. पण ज्ञानेश्वरांनीं येथे त्याचा सरोवराशीं

संबंध कसा काय लावला आहे तें समजत नाहीं. **ओ. २३२—तियापरी—** " त्याप्रमाणें, यावर सांगितलेल्या दृष्टांताप्रमाणें, हे देवा ! जर कां माझ्या पुण्याचा ओलावा नष्ट झाला, तर मग तुम्हीं आपल्या मायेनें मला भुलवितां कामा नयें " अर्जुनाच्या म्हणण्याचा इत्यर्थ असा कीं, " हे देवा ! तुम्ही तर मला लढायला सांगतां, पण त्यामुळं जर कां माझ्या गांठीं असललं पुण्य संपलं, तर मग तुम्हांला आपल्या मायेनं मला भुलवितां येणार नाहीं, भुलविणं योग्य होणार नाहीं, " **झांकऊ—झाकवणें=भुलविणें.** पहा— " आणि आपुलेन सिद्दानपणें । आम- तेंचि झाकवील " ॥ ४११ ॥–नरेंद्र, रु. स्व. स्वजनहत्येनें जर माझें असतं नसतं पुण्य संपलं, तर मग तुम्हांला मायेनं माझ्यापासून दूर होतां येणार नाहीं. आपल्या हांतुन बांधवांचा वध घडला तर आपलें पुण्य नष्ट होईल व तें नष्ट झालें म्हणजे श्रीकृष्ण आपणापासून दुरावेल, हीच अर्जुनाची भीति आहे म्हणून येथें " झांकउं नेयेसि मावा " याचा अर्थ " आपल्या मायेनं तूं माझ्यापासून दूर जातां कामा नयेस, मला तूं पारखा होतां कामा नयेस " असाच केला पाहिजे. **मावा**—मायेनं ( तृ ). **नेयेसि**—न येसी.

( **श्लोक ३७** )—म्हणून अर्जुन येथें आपला निश्चय पुनरपि व्यक्त करतो. " कौरवांना त्यांच्या परिवारासह मारणं आम्हांला उचित नाहीं, स्वजनांना मारून हे माधवा ! आम्हीं कसें सुखी होऊं सांग बरं ! " असं म्हणतांना तो श्रीकृष्णाच्या भावनेला आवाहन करतोसें दिसतें. **ओ. २३३**–" म्हणून स्वजन-हत्येचं पाप मी करणार नाहीं, या युद्धांत मी शस्त्र धरणार नाहीं, कारण यांत सर्व प्रकारानं दोष दिसत आहे. " **किडाल**—दोष. पहा—" कीं रुक्मिणींचें रूप चोखाळ । पुनु सिशुपाळें वरिलें हें किडाळ ॥ ५८५ । –नरेंद्र, रु. स्व. ' माझ्यावर किटाळ येईल '. असा वाक्यप्रयोग हल्लींही केलेला आढळतो. **ओ. २३४–मूळ** श्लोकांत " स्वजनांना मारून आम्हीं कसें सुखी होऊं, आमच्यावर नसतं किटाळ येईल, जग आपल्याला हिणवील " एवढाच अर्जुनाच्या म्हणण्याचा आशय दिसतो. पण ' कथं सुखिनः स्याम ' याचा अर्थ ज्ञानेश्वरांनीं आपल्या मताप्रमाणें " तुझ्याशीं, परमेश्वरांशीं आमची ताटातूट होईल, मग आमचं काय उरलं " असा येथेही भक्तिमार्गाला धरूनच केला आहे. ज्ञानेश्वरांच्या अर्जुनाला स्वजनहत्येनं आप-

त्याला श्रीकृष्ण दुरावेल ही भीति आहे, व या दृष्टीनेंच तो ' आम्ही कसें घरें सुखी होऊं " असें म्हणत आहे. श्रीकृष्णाचें सानिध्य हीच ज्ञानेश्वरांच्या अर्जुनाच्या सुखाची कल्पना आहे. मूळ श्लोकार्थाहून ही मुद्दा स्वतंत्र आहे. **अंतराओ**— अंतराय = ताटातूट, अंतर, विघ्न. **काइ उरैल**—परमेश्वर दुरावल्यावर भक्तांत उरलं काय? तो भक्तांचा पाठिराखा आहे तोंपर्यंत सर्व. **तेणें दुःखें**-श्रीकृष्णाच्या अंतरायाच्या, दूर होण्याच्या दुःखानं. **हियें फुटैल**—आमचं हृदय फुटेल. इतकं दुःख तुझ्यावीण आम्हांला होईल. ही ओंवी विषयानुरोधानें वास्तविक मागील ओ. २२८ नंतर लगेच यावयास पाहिजे होती कारण आपल्यापासून परमेश्वर दुरावण्याच्या आपत्तीचा प्रश्न अर्जुनानें तेथेच उपस्थित केला आहे. या श्लोकाखालीं ती पुनरुक्त वाटते. **हियें**- हृदय-पहा—' बरवेपण अनंगा न लोटे । निर्ती तरि ब्रम्हेया तुल्हाटे । प्रतापें हीयें फुटे । वैरियांचे ' ॥ ५६ ॥—नरेंद्र, रु स्व. **ओ. २३५**— " म्हणून आम्हीं कौरव मारायचे व मग आम्हीं राज्योपभोग भोगायचे, ही केवळ न घडणारी गोष्ट आहे. आमच्या हातून ती घडणार नाहीं असा अर्थ. **मातु**—गोष्ट. **अघडती**—न घडणारी, घडणें अशक्य अशी.

( **श्लोक ३८** )— " कुलक्षयाचं व मित्रद्रोहाचं पाप हे लोभी कौरव जरी लक्षांत घेत नसले, तरी " ( आम्हीं उघड्या डोळ्यांनीं तें पहात असतां, त्यांतून सूटण्याचं आम्हीं कसं बरं मनात आणूं नये ? ) अर्जुनाला येथे स्वकर्तव्याची जाणीव झाली आहे. दुसऱ्यांनीं जाणूनबुजून पाप केलं, तरी आपणाला तें दिसत असतांना त्यापासून आपण परावृत्त झालं पाहिजे, असा अर्जुनाच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. **ओ. २३६—हे**-कौरव. **अभिमानमदें**-युद्धाच्या अभिनिवेशानं व गर्वानं भ्रांतचित्त झाले आहेत. **जऱ्ही पां इं**— आणि हे जरी आमच्याशीं युद्ध करायला आले असले, तरी यांच्याशीं युद्ध करण्यांत आमचें हित आहे कीं नाहीं, हें आम्हांला पाहिलें पाहिजे. कौरवांशीं युद्ध करण्यांत स्वतःचें हित नाहीं, असेंच अर्जुनाला येथें ध्वनित करावयाचें आहे. **जाणावें लागे**— जाणणें प्राप्त आहे. आमचें हित कौरवाशीं न लढण्यांतच आहे, याचा आम्हीं विचार करणें भाग आहे. **ओ २३७**.-हीच गोष्ट दृष्टांतानें अधिक स्पष्ट करतात. " वाटेनं जातांना जर अकस्मात पुढें सिंह

दिसला, तर शक्य तों त्याला चुकविलें तरच वांचण्याची कांहीं आशा आहे." तद्वतच स्वजनहत्या जोंपर्यंत आपणास टाळता येईल तितकी टाळल्यासच तिच्यापासून घडणाऱ्या पापांतून आपली सुटका होईल, असा अर्जुनाच्या युक्तिवादाचा रोख आहे. **तो चूके** इ०--त्याला जितकं चुकवितां येईल तितकं चुकविल्यासच **वाचिजे**-वाचतां येईल.

(**श्लोक ३९**)—" आपल्या हांतून कुलक्षयाचं पातक घडणार हें जर आपण उघड्या डोळ्यांनीं पाहतों, तर त्या पातकापासून कसं परावृत्त व्हायचं, हें नको कां पहायला ? त्या पापापासून कसं सुटायचं ते नको कां समजून घ्यायला ? " अर्जुनाच्या मतें या स्वजनहत्येच्या पापांत आपण गुंतणारच नाहीं असा कांहींतरी उपाय आपण शोधून काढला पाहिजे. **ओ. २३८--आपुले आपण** इ.— आपलेच भाऊबंद, आपलींच माणसं, आपण मारणं म्हणजे जाणून बुजून विष पिणें आहे. विषाचे परिणाम जसे घातुक, तसेच या स्वजनहत्येचे परिणाम अंतीं घातक आहेत असा भावार्थ. **कालकूट**-विष. **ओ. २३९**--नित्याच्या पद्धतीप्रमाणें हीच गोष्ट एका दृष्टांतानें विशद करतात. " एकाद्यानें आपल्या हातांत असलेला दिवा घालवावा व मग पुढचं दिसेनासं झालं म्हणून एकाद्या अंधाऱ्या विहिरींत पडावं " तसाच लाभहीन प्रकार अर्जुनाला येथे दिसत आहे. त्याचं म्हणणं असं कीं, " स्वजनांना मारणं हें पाप आहे " ही गोष्ट आपणास कळत असतां, ती बाजूला सारणं व मुद्दाम डोळ्यावर कांतडें ओढून घेऊन स्वजनवधाच्या पापाला प्रवृत्त होणं म्हणजे, हातांतला दिवा मालवून टाकून एकाद्या अंधाऱ्या विहिरींत पडण्यासारखं अज्ञानीपणाचं आहे. **आश्रावा**—आश्रय करावा. **तरि तेथे इ०**-अशा जाणूनबुजून अज्ञानीपणानं वागण्यांत फायदा काय ? **ओ. २४०**—एका दृष्टांतानें ज्ञानेश्वरांचें समाधान होत नाहीं, म्हणून ते आणखी दुसरा दृष्टांत योजीत आहेत. वास्तविक मागें ओ. २१७ मध्यें ' मार्गातल्या सिंहा ' चा दृष्टांत दिल्यानंतर, या ओवींत पुन: त्याच स्वरूपाच्या ' मार्गातल्या अग्नीच्या ' दृष्टांताची फारशी जरूरी नव्हतीच. " तसेंच वाटेंत अग्नि पाहून जर त्याला ओलांडून आपण गेलों नाहीं, तर तो आपणास एका क्षणांत व्यापून जाळूं शकेल. " तद्वतच स्वजनवधाचं पुढं दिसणारं पाप जर आपण टाळलं नाहीं, तर तें पाप लवकरच आम्हांस गिळून

टाकील. त्या पापाचें किटाळ खात्रीनें लागेल. पाविजे—जाइजे. ( वच् = जाणें ). ओसंडुनि—टाकून, सोडून. कवळूनि-व्यापून. ओ. २४१-" त्याप्रमाणें हीं स्वबांधववधाचीं पापें आमच्या अंगाला चिकटूं पाहत आहेत, हें आम्हांला समजत असतांना आम्हीं त्या पापांना कसें प्रवृत्त व्हावें ? " कौरवांना लढाईत मारलं तर आम्हांला मूर्तिमंत पाप लागणार, हें जर उघड उघड दिसतं, तर त्या पापाचे धनी काय म्हणून व्हायचं, असा अर्जुनाचा हा युक्तिवादात्मक प्रश्न आहे. मूर्त-मूर्तिमंत, साक्षात्. वाजों पांत – लागूं पहात आहे, लागण्याच्या बेतांत आहे. वाजणें = लागणें. या ओवीनंतर सिद्धनाथ, साखरे व माडगांवकरप्रतींत दिलेली ओंवी मागून कोणी तरी जोडून घेतली आहे असें वाटतें.

( श्लोक ४० )—कुलक्षय झाला असतां पूर्वापार चालत आलेले कुलधर्म नष्ट होतात, व कुलधर्म नष्ट झाले म्हणजे कुलांत अधर्माचें साम्राज्य माजतें. " एका कुलक्षयाच्या आपत्तींतून एका मागून एक दुसऱ्या आपत्ती कशा उद्भवतात, हेंच अर्जुन येथून ४४ श्लोकापर्यंत सांगत आहे. पण ज्ञानेश्वर प्रस्तुत कौरवपांडवांच्या युद्धांत कुलक्षय कसा होणार आहे त्याचेंच अधिक वर्णन करतात. मूळ गीतेंचा एका कुलक्षयांतून नरकापर्यंतच्या अनेक आपत्ती कशा एका मागून एक चालून येतात, एक करायला जावें तर भलत्याच गोष्टी कशा उद्भवतात, हें वर्णन करण्याचा जो रोख, तो ज्ञानेश्वरांनीं येथे फारसा लक्षांत घेतलेला नाहीं. ओ. २४२-–स्वजनांनीं स्वजनांना मारलं म्हणजेच कुलक्षय होतो, व हें स्पष्ट करण्यासाठीं येथे काष्ठाचा दृष्टांत दिला आहे. " ज्याप्रमाणें लाकडावर लाकूड घासलें असता अग्नीच उत्पन्न होतो व तो भडकल्यावर सर्वच लाकडें जाळून टाकतो "। स्वजात स्वजातलिच कशी काळ होते, हें पटण्यास हा लाकडाचा दृष्टांत मोठा समर्पक आहे. मथिजे—घासलें गेलें असतां. काष्ठजात—काष्ठसमूह, लाकडांचा ढीग. प्रज्वललेनि—प्रज्वलित झाला असतां, भडकला असतां. ओ. २४३—" त्याप्रमाणें एकाच कुळांतल्या माणसांत एकमेकांकडून जर मत्सरानें वध घडला, तर त्यानें सर्वच कुळाचा नाश होतो. " । आपण जर कौरवांना युद्धांत मारलं, तर ते आपल्याच कुळांतले असल्यानें, आपण आपल्याच कुळाचा क्षय केल्यासारखें होणार आहे, हें अर्जुन श्रीकृष्णांच्या निदर्शनास आणतो. नाशो-नाश.

**ओ. २४४**–" म्हणून कुलक्षय झाला कीं, कुलांतले जे आचार असतात ते थांब-तात व मग त्या कुलांत अधर्म वाढतो. " **पणे पापें**–या कुलक्षयाच्या, जाति-वधाच्या पापानें. **वंशजधर्म**-कुलधर्म ,कुलाचार. प्रत्येक कुलाचे कुटुंबाचे आचार, रूढी कांहीं निराळया असतातच **अधर्मू**–वाईट चाली रीती. **आरोपे**-उद्‌भवतात.

( **श्लोक ४१** )– अधर्माचा फैलाव होतांच कुलस्त्रिया बिघडतात, व स्त्रिया बिघडल्या कीं, हे वार्ष्णेया ! वर्णसंकर होतो " असा एकांतून दुसरा अनर्थ कसा निर्माण होतो, तें गीतेंत ज्या कार्यकारणभावाच्या पद्धतीनें विशद केलें आहे, ती पद्धति ज्ञानेश्वरांनीं दुर्लक्षिली आहे **ओ. २४५**- या ओंवींत अधर्म कसा घडतो तें सांगितलें आहे. " सारासार विचार न करतां प्रत्येकाचें मन मानेल तसें वागणें असें कीं, ज्यांत विधिनिषेध कोठेंच नाहीं " **विचा-रणे**- विचार करणें. ही गोष्ट चांगली अथवा वाईट याचा विचार न करतां कोणी कसेंही वागणें व त्या वागण्यांत अमुक करणें योग्य किंवा अमुक करणें त्याज्य यासंबंधीं कसलीच मर्यादा न पाळणें, यालाच अधर्म म्हणतात. **विधिनिषेध**-- कोणती गोष्ट करावी या संबंधींचा जो नियम तो विधि व कोणती गोष्ट करू नये या संबंधीचा जो निर्बंध त्याला निषेध म्हणतात. ' खरें बोलावें ' हा विधि, तर ' खोटें बोलूं नये ' हा निषेध होय. **पारुखाति**- कुंठित होतात, थांबतात. पहा- " पुणु ज्ञानाचा नाचु तिये रंगीं । पारुखोचि ना ॥ ४६३ ॥- भास्कर, उद्धवगीता. **ओ. २४६**- " हातांत असलेला दिवा टाकल्यावर मग अंधारांत फिरावें लागून पुढेंच अडखळून पडावें लागावें त्याप्रमाणें. " अशाच प्रकारचा दीप-अंधकाराचा दृष्टांत ओ. २३९ मध्यें आला असल्यानें, तो येथे द्विरुक्त वाटतो. **धवडणे**–दवडणें, दूर सारणें. **राहाटणे**—फिरणें, इकडे तिकडे जाणें. **उजू**- पुढें. **आडलणे**—अडखळणें. **ओ. २४७.** " त्याप्रमाणें कुलक्षय झाल्यावर धर्म नष्ट होतो, व मग पापाचरणा-शिवाय दुसरं काय संभवणार ? " वरच्या ओंवींच्या दृष्टांताप्रमाणें पाहिल्यास हातचा दिवा टाकून दिल्यावर अंधःकार होऊन ज्याप्रमाणें माणूस पुढेंच आडखळून पडतो, त्याप्रमाणें कुलांतील माणसांचा वध झाला म्हणजे धर्माला, कुलाचारांना धुणा बसतो, व कुलाचाराकडे, आपापल्या जातिधर्माकडे दुर्लक्ष झालें

कीं, मग त्या कुलांत पापाचरण होऊं लागतें, अशी ही अनर्थपरंपरा आहे. **ओ. २४८.** अधर्माचें मूळ कारण कुलस्त्रिया होत. त्या बिघडल्या कीं, चातुर्वर्ण्यांत भेसळ होते. कुळाची सोज्वळता मग राहत नाहीं हें कसें घडतें तें वर्णन करतात. " जेव्हां इंद्रियांचें संयमन व नियमन थांबतें, त्यावेळीं तीं सैरावैरा धावूं लागतात. आणि यामुळेंच मग स्त्रिया व्यभिचारी बनतात. " **यम**—इंद्रियें आवरून धरणें. **नियमन**-इंद्रियांना योग्य कार्यीं योजणें. **टकति**-स्थिर राहती, थांबतात. **व्यभिचार**-दुराचार, परपुरुषगमन. **ओ. २४९**—मागील ओवींत कुलस्त्रियांच्या व्यभिचाराचा प्रश्न चर्चिला असल्यानें, ही ओवी देखील, त्यांनाच अनुलक्षून आहे, असें समजलें पाहिजे. " उच्चवर्णाच्या स्त्रिया ज्यावेळीं नीच वर्णाच्या पुरुषांशीं व्यवहार करतात, त्यावेळीं उच्चवर्ण व नीचवर्ण एकमेकांत मिसळून भिन्न भिन्न जातींच्या धर्माचा, आचारानियमांचा उच्छेद होतो. " **उत्तम अधर्मी १.**– ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण असून, त्यांत पहिला दुसऱ्याहून, दुसरा तिसऱ्याहून, व तिसरा चवथ्याहून श्रेष्ठ आहे, अशी समजूत होती. स्त्रीपुरुष-विवाह त्या त्या जातींत विहित होतेच. पण उच्चवर्णीय पुरुषानें त्याच्या खालच्या वर्णाची स्त्री करण्यास पूर्वी हरकत नसली, तरी उच्चवर्णीय स्त्रीनें तिच्या खालच्या जातीच्या पुरुषांशीं विवाह करणें निषिद्ध होतें. यालाच अनुक्रमें अनुलोम व प्रतिलोम विवाहपद्धति म्हणतात. **वर्णावर्ण**-उच्च जात व नीच जात. जाती-जातींचा एकंकार होणं, म्हणजेच वर्णसंकर होणं, असा स्पष्ट अर्थ येथ दिला आहे. **ओ. २५०**–स्त्रियांच्या व्यभिचाराचें हें महापाप कुळांत कसं उघडपणानं शिरतं तें ज्ञानेश्वरांनीं येथे एका अनुरूप दृष्टांतानें फारच मार्मिकपणें विशद केलें आहे. "ज्याप्रमाणें चव्हाट्यावर टाकलेल्या काकबळीवर कावळे चोहोंकडून झडप घालतात, त्याप्रमाणें व्यभिचाराचीं हीं महापापें कुळांत चोहोंकडून प्रवेश करतात." चव्हाट्यावर टाकलेल्या काकबळीवर झडप घालण्यास कावळे टपलेले असतात, त्याप्रमाणें भ्रष्ट झालेल्या कुलस्त्रीवर पापी नजर ठेवण्यास सर्वांनाच मुभा असते, हा भाव 'कुळा' ला चव्हाट्यावरच्या काकबळीची व महापापांना कावळ्यासारख्या निंद्य पक्ष्याची उपमा देऊन ज्ञानेश्वरांनीं फारच औचित्यानें ध्वनित केला आहे. **बळी**-रोज 'वैश्वदेवा' नंतर बाहेर काकबळी म्हणून भाताचा घास टाकतात तो. **चोहटा**-चव्हाटा.

( **श्लोक ४२** )–संकराचाही पुढें परिणाम काय होतो, तें या श्लोकांत सांगितलें आहे. " वर्णसंकर हा कुळ बुडविणाऱ्यांना व कुळाला नरकाला नेतोच व श्राद्धांत पिंडदान व पितृतर्पण बंद पडल्यामुळें, त्यांचे पितरही पतन पावतात. " पितरांना श्राद्धांत जोंपर्यंत त्यांच्या पुत्राकडून अथवा प्रपौत्राकडून पिंडदान व तर्पण मिळतें, तोंपर्यंत ते स्वर्गांत राहूं शकतात अशी कल्पना असून, पितरांना हें पिंडदान व तर्पण मिळण्याचें बंद झालें कीं, ते स्वर्गातून खालीं पडतात अशी समजूत आहे. **ओ. २५१**— " मग त्या सर्व कुळाला व वर्णसंकरानें तें कुळ भ्रष्ट करणाऱ्यांना, दोघांनाही नरकाला जाणें भाग पडतें. " **जाणें आथि**— जाणें प्राप्त होतें, जावेंच लागतें. **ओ. २५२**— अर्जुन श्रीकृष्णाला म्हणतो. " याप्रमाणें कुळाचा वंशविस्तार किंवा सर्वच भावी पिढ्या पतित होतात. या पिढ्यांचा जन्म व्यभिचारानें झाला असल्यामुळें, ती सर्व संतति पतित, अपवित्र मानली जाते. अशा रितीनें आपले वारस पतित झालेले पाहून स्वर्गाला गेलेले पितरही पृथ्वीवर परततात. ते स्वर्गातून खालीं पडतात. **ओवांडति**— परत फिरतात, परत येतात. **पूर्वपुरुष**--पितर. **ओ. २५३**— " ज्या कुळांत नित्य होणारीं कर्में व नैमित्तिक कर्में बंद पडतात, तिथें श्राद्धविधि करून तिलोदक तरी कोण कोणाला अर्पण करणार? **नित्यक्रिया**—संध्यावंदनादि ब्राह्मणाची कर्में. हीं रोज करावींच लागतात, त्यांना नित्यकर्में म्हणतात. **नैमित्तिककर्में**-प्रसंगविशेषीं उपस्थित झालेलीं धार्मिक कृत्यें. उदाहरणार्थ एखादा प्रायश्चित विधि किंवा ग्रहशांति करणें हीं नैमित्तिक कर्में होत. अशीं नित्य व नैमित्तिक कर्में करण्याचें कुळांतल्या लोकांकडून थांबल्यावर, मग श्राद्ध करून त्यांत पितरांना तिलोदक तरी कोण कोणाला देणार ? श्राद्धांत देवांच्या नांवानें यवोदक व पितरांच्या नांवानें तिलोदक सोडून, श्राद्ध करणारा देवांना व पितरांना संतुष्ट करतो. हें यवोदक व तिलोदक तर्पण, देवांना व स्वर्गात पितरांना पोचतें अशी कल्पना आहे. **टके**-थांबे. पहा मागें ओ. २४८. **पारुखे**-कुंठित होते. पहा मागें ओ. २४६. प्रस्तुत ओवी लिहितांना ज्ञानेश्वरांच्या पुढें श्राद्धविधींतील " आब्रह्म-भुवनान्लोकान् सप्तद्वीपनिवासिनाम् । अतीतकुलकोटीनाम् इदमस्तु तिलोदकम् ॥ " हा श्लोक असावा असें वाटतें. **ओ. २५४**— पितरांना जर त्यांच्या कुळसंततीपासून स्वर्गात तिलोदक पोंचलें नाहीं, तर ते स्वर्गात राहूं शकत

राहींत, व मग ते खालीं पृथ्वीवर आपल्या कुलाकडे पुनः उतरतात. त्यांचा अधःपात घडतो. ओ. २५५—" ज्याप्रमाणें पायाच्या नखाच्या टोंकाला चावलेल्या सर्पाचें विष झपाट्यानें मेंदूपर्यंत चढतें, त्या विषानें तो मनुष्य नखशिखांत व्यापला जातो, तद्वतच ब्रह्मदेवापर्यंत वर पोचलेलें आपलें कुल हत्येच्या पापानें बुडविलें जातें" ! **आब्रह्मिजे**—बुडविलें जातें. सर्पाचें विष जसें तळपायापासून मस्तकापर्यंत झटकन् चढतें, त्याप्रमाणें हे स्वजनहत्येचं पाप देखील, त्या कुलाच्या पृथ्वीवरील संततीपासून वर ब्रह्मदेवापर्यंत व्यापून राहतें. ब्रह्मदेवापासून सर्वांची उत्पत्ति असल्यामुळें, प्रत्येक कुलाचा उगम 'ब्रह्मदेव' आहे. म्हणून एकाद्या कुळाला कसलेंही पाप लागलें, तर त्याची झळ वर ब्रह्मदेवालाही लागते. म्हणून अर्जुनाचें म्हणणें असें कीं, आपल्याकडून जर स्वजनहत्येचं पातक घडेल, तर आपल्यापासून वर ब्रह्मदेवापर्यंत लागलेलें आपलें पांडवकौरवकुल, पातकांत बुडून जाईल. **व्याळु**—सर्प. **शिखांत**—शेंडीपर्यंत.—**आब्रह्म**—ब्रह्मदेवापर्यंत.

(**श्लोक ४३—४५**)—" कुलहत्या करणाऱ्यांच्या या वर्णसंकरकारक पातकामुळें, जातींचें व कुलांचें परंपरागत चालत आलेले धर्म नष्ट पावतात." व अशारीतीनं " जे धर्मनष्ट झाले आहेत, त्या माणसांना हे जनार्दना ! नरकांतच राहावं लागतं असं आम्ही ऐकत आलो आहो." " पहा बरं ! राज्यसुखलोभानं स्वजनांची हत्या करण्यास तयार झालेले आम्हीं, केवढं मोठं पाप करण्याच्या खटपटींत आहोंत !" या स्वजनहत्येचं पाप म्हणजे शेवटीं नरकवास, असा अर्जुनानें परंपरागत चालत आलेला अभिप्राय दिला असून, असं वाईट फळ देणारं केवढं मोठं पाप आपल्या हांतून घडत आहे, अशी भीतीही त्यानें व्यक्त केली आहे. हें पाप आपल्या हांतून होण्याच्या अगोदर आपण शक्य तर तें टाळलें पाहिजे, असाच भाव या भीतींतून व्यक्त झाला आहे. **ओ. २५६**—हें स्वजनहत्येचं पातक करणाऱ्यालाच केवळ लागतें असें नसून, ज्या ज्या लोकांशी त्याचा संसर्ग घडेल, त्याला त्याला तें लागतें, असें या ओंवींत ज्ञानेश्वरांनीं स्पष्ट केलें आहे. पण या संसर्गजन्य पापाचा प्रकार मूळ गीतेंतील श्लोकांत विवक्षिला आहे असें दिसत नाहीं. **संगदोषें**—संसर्गाच्या दोषानें.

वरील स्वजनहत्येचें महापातक करणाऱ्यांच्या संसर्गानें. **लौकिक**—लोकाचार. वरील पापी लोकांशीं संबंध आलेल्या लोकांचे आचार देखील भ्रष्ट होतात. पापी लोकांच्या संसर्गानें इतर तत्संबंधी लोक देखील आचारभ्रष्ट होतात. **ओ. २५७**—जर आपल्या घराला अकस्मात् अग्नि लागून तो पेटला, तर तो दुसऱ्या आजुबाजूच्या घरांना ज्याप्रमाणें जाळून टाकतो. **वानिवसें**-दैववशात्, अकस्मात् (क्रियाविशेषण). **वन्हि आला**-आग लागली तर. **पाजलला**-प्रज्वलित झालेला असा. **जाळौनि घली**—( हें संयुक्त क्रियापदाचें उदाहरण आहे. ) जाळून टाकतो. **ओ. २५८**—" त्याप्रमाणें त्या पापी कुलाच्या संगतींत जे जे लोक येतात, त्यांनाही त्या निमित्तानें त्या पापाची बाधा होते. " त्या पापी कुलाच्या संसर्गानें इतर लोकांनाहीं त्या पापाचा त्रास सोसावा लागतो. **कुलसंगती**—त्या पापी कुलाच्या संगतींत ( सप्तमी ). एका घराला लागलेल्या आगीची झळ जशी शेजारच्या घरांना लागते, तद्वत् एकाद्या कुलानें केलेल्या पापाची झळ, त्या कुलाच्या संगतींत असणाऱ्या इतरांनाही सोसावी लागते. अर्जुनाचें म्हणणें असें कीं, आपल्या हांतून स्वजनहत्येचं पाप घडल्यास, त्याची दुष्ट फलं आपल्या कुळाला भोगावीं लागतील, व आमच्या कुळाच्या संसर्गात जीं माणसें येतील त्यानांही मग त्या पापाचें प्रायश्चित मिळेल ! म्हणून स्वजनवधाला आपण उद्युक्त न होणेंच चांगलें ! **ओ. २५९**--" याप्रमाणें अनेकप्रकारच्या पापांनीं लिडबिडलेलें तें कुल, भयंकर नरकांत पडतें. असें अर्जुन म्हणाला. " **संकुल**-व्याप्त, व्यापलेलें. **निरय**--नरक. **महाघोर**--कुंभीपाकादि भयंकर प्रकारचे नरक. **ओ. २६०**--" अशा नरकांत पडल्यावर मग कल्पांत झाला तरी त्यांतून सुटका नाहीं. या कुलक्षयांत अशा प्रकारचं पतन आहे. " **तिये ठाइं**--त्या ठिकाणीं, त्या नरकांत. **कल्पांतीं**—पृथ्वीप्रळय झाला तरी. पृथ्वीप्रलय झाला असतां सर्व जगच नष्ट होणार असल्यानें, त्यावेळीं तरी निदान या पाप्याची त्या नरकांतून सुटका होईल म्हणावं, तर त्याची सुटका अशा प्रलयकाळीं देखील होत नाहीं, इतक्या तीव्र स्वरूपाचें त्याचें तें पतन आहे, असें अर्जुन सांगतो. कुलक्षयकृत पाप अशा भयंकर स्वरूपाच्या नरकांत पडणारें आहे, त्याअर्थी तें हातानं घडूंच नये हें उत्तम, असा अर्जुनाचा अभिप्राय. **उगंडु**—सुटका. **एसणें**-अशाप्रकारचें. **ओ. २६१**-अर्जुन म्हणतो-" देवा ! आता-

पर्यंत या कुलक्षयाच्या पापाचा घोर परिणाम मी सर्वप्रकारनें ऐकला, पण अजून-पर्यंत माझ्या मनांत त्या पापाबद्दल भीति उत्पन्न होत नाहीं, यावरून माझें हें अंतःकरण वज्राचें केलें कीं काय कोण जाणें ! " अर्जुनाचा आशय असा कीं, आतापर्यंत कुलक्षयकृत पापाचं फल भयंकर नरक हें आहे. असं अनेक प्रकारांनं ऐकून सुद्धां, माझ्या हृदयांत त्याबद्दल भीति उत्पन्न होत नाहीं. वास्तविक वरील प्रकारची फलश्रुति ऐकून माझं हृदय फुटून जायला पाहिजे होतं. पण ज्याअर्थी तें फुटलं नाहीं, त्याअर्थी तें वज्राचच घडिवलं असलं पाहिजे. समानार्थक पहा—" लोहबंधैर्बबंधे नु वज्रेण किं विनिर्ममे । मनो मे न विना रामाद्यत्पुस्फोट सहस्रधा " ॥—भट्टीकाव्य. **हियें**—हृदय. **अवधारणें**—ऐकणें. **ओ. २६२**—" ज्या शरीरासाठी या राज्यसुखाची अपेक्षा करायची, तें तर क्षणभंगुर आहे. आणि हें जाणत असूनही आपण पापांचा अव्हेर करूं नये ना ! " ज्या जीवितासाठीं कौर-वांकडून राज्य जिंकून आपण सुख भोगायचं, तें जीवितच जिथं क्षणिक, चंचल आहे, व हें सर्व समजून उमजून पुनः आम्हीं स्वजनहत्येचं पाप टाळूं नये ना ! कमाल आहे आमच्या निगरगट्टपणाची ! असा अर्जुनाचा एकंदरीनें भावार्थ. **जेयालागि**—ज्या शरीर अथवा जीवनासाठीं. **अव्हेरणें**—टाळणें, बाजूला सारणें. **ओ. २६३**—" आतां ही सर्व आपली वडील माणसं मारायच्या दृष्टीनं आम्हीं दृष्टीखालून घातली, यांतच आमच्याकडून काय कमी पाप घडलं असं तुला वाटतं ? सांग बरं ! " कुरुक्षेत्रावर जमलेल्या भीष्मद्रोणादि वडील माणसा-कडे वध्य या दृष्टीनं आपण पाहिलं, हेंच मोठं पाप आपल्याकडून घडलं असं अर्जुनाच्या हळुवार मनाला वाटलं. **दिठीं सूदले**—दृष्टीखालीं घातले. " दिवि सूदेल " हा सिद्धनाथप्रतीचा पाठ मुळींच अग्राह्य आहे. ' दिठीं सुदले ' हा तर यादवकालीन भाषेचा एक सांप्रदाय असून, ' दिवी सूदले= भर दिवसा सज्ज झाले, या रा. हर्ष्यांच्या अर्थांत कांहींच स्वारस्य नाहीं. **थेकुलें**—थोडे, कमी ( पाप ).

( श्लोक ४६ )—"त्यापेक्षां कोणताही प्रतीकार न करणाऱ्या व शस्त्रसंन्यास केलेल्या मला, जर हे शस्त्रधारी कौरव रणांगणावर ठार करतील, तर तें मात्र माझ्या कल्याणाचें होईल " या मूळ श्लोकार्थाचा जोरदार भाव ज्ञानेश्वरांच्या टीकेंत म्हणावा तसा उतरला नाहीं. **ओ. २६४.** " आतां यापुढें जगण्यापेक्षां आपण

शस्त्रें टाकून देऊन कौरवांचे बाण सहन करावे हें उत्तम !" "धार्तराष्ट्रा रणे हन्युः" यांतील तीव्रता 'साहावे बाण एयांचे' या अनुवादांत मुळींच आलेली नाहीं. **इयावेन्हि**–यापुढें. **तेयापासौनि**–त्यापेक्षां. **संडौनु**–सांडून, टाकून देऊन. **बाण साहणें**–बाणांचा वर्षाव सहन करणें. **एयांचे**–कौरवांचे. **ओ. २६५–**" यापुढं जितकं करून मरण येईल तितकं बरंच ! पण या स्वजनवधाच्या पापाशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं." आपण कौरवांना मारण्यापेक्षां कौरवांनींच आपल्याला मारलं तर तें उत्तम. म्हणजे आपल्या हातून स्वजनहत्येचं पाप घडणार नाहीं हा, "आपल्याला कौरवानीं रणांत मारावं" असं म्हणण्यांत अर्जुनाचा आशय आहे. ज्ञानेश्वरांनीं उलट, अर्जुन कोणिकडून तरी मरणाची अपेक्षाच करित होता, असा जो त्याच्या मनांतील भाव व्यक्त केला आहे, त्याला मुळांत आधार नाहीं. अर्जुन स्वजनवधाचं पाप टळावं म्हणूनच कौरवाकडून फार तर मरणाची अपेक्षा करीत होता. कोणीकडून कां होईना आपल्याला मरण यावं इतपत कांहीं तो वैतागला नव्हता. **कल्मष**–पाप. **चाड**–इच्छा, आवड.

(**श्लोक ४७**)–" असें रणांगणावर बोलून शोकसंकुल झालेला अर्जुन, धनुष्यबाण टाकून देऊन रथांत आपल्या जागीं जाऊन बसला." या वेळपर्यंत अर्जुन रणांगणावर उभा राहून बोलत होता. पण आतां शोकाविव्हल होऊन लढण्याचें नाकारल्यावर, यापुढें आपणास कांहींच कर्तव्य नाहीं असें सुचविण्यासाठीं तो रथाच्या हौद्यांत आपल्या जागीं जाऊन बसला. **ओ. २६६—** अर्जुन असं असं रणांगणावर बोलला, ही बातमी संजय धृतराष्ट्राला देतो, व अर्जुनानें पुढें काय केलें याचेंही वर्णन करतो. **ओ. २६७.** संजय सांगतो, "अर्जुनाला विषाद वाटला, त्याला आलेला गहिंवर त्यालाच आवरतां आला नाहीं. मग त्यानें रथावरून खालीं उडी घातली." मूळ श्लोकांत अर्जुन रथांत आपल्या नेहमीं बसण्याच्या जागीं जाऊन बसला, असा स्पष्ट उल्लेख असतां, ज्ञानेश्वरांनीं "त्यानें रथांतून खाली उडी मारली" असा जो त्याचा अनुवाद केला आहे, तो बरोबर वाटत नाहीं. यावरून अर्जुनानें यावेळपर्यंत श्रीकृष्णाशीं जो संवाद केला तो रथांत बसून केला, अशी त्यांची समजूत होती असें दिसतें. वास्तविक रणांगणावर आपल्याशीं लढण्याला कोण कोण आले आहेत

हें सूक्ष्मतेनें पाहण्यासाठीं, श्रीकृष्णानें दोन सैन्यांच्या मध्यभागीं रथ आणल्यावरच अर्जुन रथाखालीं उतरला होता. तो आतां शेवटीं न लढण्याचा निश्चय झाल्यावर पुनरपि रथांत आपल्या जागीं जाऊन स्वस्थ बसला. ही घटना ज्ञानेश्वरांनीं लक्षांत घेतलेली नाहीं. **न धरे**-त्याचा धीर सुटला. **रथौनिया**-रथापासून. **ओ. २६८**-अर्जुनाला विषाद वाटून तो कसा निस्तेज झाला, हें एक दोन दृष्टांतांनीं स्पष्ट करतात. " ज्याप्रमाणें एकादा पदच्युत झालेला राजकुमार पूर्णपणें निस्तेज होतो, किंवा राहूनें ग्रासलेला सूर्य जसा कांतिहीन होतो, त्याप्रमाणें विषादानें, खिन्नतेनें व्यापलेला अर्जुन तेजोहीन दिसला." येथें विषाद पावलेल्या अर्जुनाला राज्यभ्रष्ट झालेल्या राजाची किंवा ग्रहण लागलेल्या सूर्याची उपमा किती सार्थ आहे ! यादवांच्या राजवटींत असे राज्यभ्रंशाचे प्रसंग ज्ञानेश्वरांनीं पाहिले असावे. **उपहतु**-निस्तेज, हतवीर्य. **ओ. २६९**—आणखी दृष्टांत देतात. " किंवा एकादा ब्रह्मसाक्षात्काराच्या मागें लागलेला हटयोगी, मध्यंतरींच महासिद्धींच्या मोहानें जिंकला जाऊन ऐहिक इच्छेला बळी पडतो व अगदीं दीन होऊन जातो, " तद्वतच अर्जुनही दीन झाला. ब्रह्मसाक्षात्कारासारख्या मोठ्या ध्येयानें प्रेरित होऊन हटयोग आचरणाऱ्या योग्याला, मध्यंतरीं आणिमा, लघिमा, प्राकाम्य, इशित्वं, वशित्व इत्यादि अद्भुत चमत्कार घडवून आणणाऱ्या सिद्धी प्राप्त होतात. पण या सिद्धींच्या मोहांत पडून वाटेल ते ऐहिक सुखोपभोग मिळविण्याची चट एकदा त्याला लागली कीं, ब्रह्मसाक्षात्काराचें त्याचें उदात्त ध्येय एकीकडेच राहतें, व ब्रह्मनिर्वाणाच्या उंचीपर्यंत पुढें कधींच पोचतां न आल्यानें त्याला मग दीन होऊन बसावें लागतें. अर्जुनाची हीच गत झाली. तोही कौरवांना जिंकून पृथ्वीचें राज्य मिळविण्याच्या उच्च ध्येयानें प्रेरित होऊनच रणांगणावर आला होता. पण मध्यंतरीं त्याला स्वजनांच्या करुणेनें ग्रासल्यामुळें, आपलें वीराचें उदात्त ध्येय सोडून त्याला दीन होऊन बसावें लागलें. विषण्ण अर्जुनाला सिद्धींनीं भुललेल्या योग्याची उपमा ज्ञानेश्वरांनीं मागें ओ. १८८ मध्येंही दिली आहे. यावरून नाथपंथप्रणीत हटयोग व ब्रह्मसाक्षात्काराचें त्याचें परमोच्च ध्येय, याबद्दल ज्ञानेश्वरांना केवढा जिव्हाळा वाटत होता, हेंच पुनरपि येथे स्पष्ट झालें आहे. ' भिंत चालविणें ' किंवा ' रेड्यामुखीं वेद बोलविणें, ' यासारखे अद्भुत चमत्कार ज्ञानेश्वरांनीही केले असले, तरी तेंच आपल्या तपश्चर्येचं सारसर्वस्व न मानतां, जागतिक

उपाधिपासून पूर्णपणें मुक्त होऊन परब्रह्मपदीं लीन होण्यासाठीं त्यांनीं शेवटीं आळंदीस जिवंत समाधि घेतल्याचें प्रसिद्धच आहे. **महासिद्धिसंभ्रमें**-अष्टमहासिद्धींच्या मोहानें. **तापसु**—हटयोगी. **कामें**--इच्छेनें. **दीनु**-हतबल, निस्तेज. **ओ. २७०-राहवरु**-रथ. येथे अर्जुनानें रथाचा त्याग केला असे पुनः ज्ञानेश्वर सांगतातच. **ओ**. २७१- उद्विग्न अर्जुनाचें हें शब्दचित्र आहे. **न धरत**-त्याचा धर सुटला, सहनशक्ति नष्ट झाली. 'धर धरणें' ही मराठींत म्हण आहेच. हाच शब्द ओ. १६७ मध्यें आला आहे. येथें संजयाचें धृतराष्ट्रापुढील निवेदन संपलें आहे. **ओ**. २७२—यानंतर अर्जुन खिन्न झालेला पाहून श्रीकृष्ण त्याला काय निर्णय देतात, त्याच्यापुढें वेदांताचें कसें विवेचन करतात, (ही कथा पुढें येणारच आहे ). ओ. २७३-ही दुसऱ्या अध्यायापासून पुढें सुरू होणारी कथाच ज्ञानदेव निवृत्तिनाथापुढें सांगणार असून, ती ऐकायलाही मोठी कौतुकास्पद आहे. आपल्या पुढील विवेचनाचा ज्ञानेश्वरांनीं हा प्रस्तावच करून ठेवला आहे.

卐✶卐

# कठीण शब्दांचा कोश

अ

अडदरणें — भिणें
अनकलित — न कळतां
अनुवादणें — सांगणें
अंतौरिया — बायका
अपाडें — अधिक
अप्रतिमल्ल — प्रतिस्पर्धी
अवगमणें — उमगणें, समजणें.
अवधारणें — ऐकणें
अवलीला — सहज
अशेख — सर्व

आ

आगला — अधिक
आघवे — सर्व
आंकणा — पायांतला अलंकार
आडळणें — अडखळणें
आणिकी — दुसरी
आंदोलणें — झोके देणें
आपैसा — आपोआप
आप्लवणें — बुडणें
आरणीं — युद्धभूमीवर
आराइणें — अनुकूल करणें
आरोपण — ठेवणें
आव — महत्त्व, प्रतिष्ठा
आवरणें — व्यापणें
आस्फालणें — वाजूं लागणें
आस्फुरणें — वाजविणें

उ

उगंडु — सुटका
उचलणें — निघणें
उठावणें — चाल करून जाणें
उद्दंड — उदंड, पुष्कळ
उद्यत — तयार
उधवणें — उचलणें
उन्मेख — ज्ञान
उपकरणें — खर्ची घालणें, देणें
उपजणें — होणें
उलंडणें — उलथणें
उपसाहणें — क्षमा करणें
उपसंहरणें — संपणें
उपहत — निस्तेज

ए

एकवटणें — एकत्र होणें

ओ

ओखटें — वाईट
ओवांडणें — परत येणें

क

कडसणें—कढावेणें
कल्मष—पाप
कवळणें—व्यापणें
काचें—कच्चें
कांटाळा—कांटा, शहारे
कांतले—कोरून तयार केलेले
कालकूट—विष
कीडाल—दोष
कुलकर्णी—चातुर्य
कुलहरणी—कुलाचा नाश करणारी
कोडें—सहज

ख

खद्योत—काजवा
खाखातें—कर्कश
खेवणें—कोंदणे

ग

गजघटा—हत्तींचा कळप
गजबजणें—घाबरणें
गरुवती—महनता, गांभीर्य
गवसणें—सांपडणें, गुफ
गहिरु—गंभीर

च

चाड—इच्छा
चोखडपणें—सुंदरपणें
चोहटा—चव्हाटा

ज

जवळिकें—संनिध
जावळीचे—जुळे
जिव्हार—अंतःकरण
जूझ—युद्ध
जोडणें—प्राप्त होणें

झ

झाकवणें—भुलविणें
झोंबणें—लगटणें

ट

टकणें—थांबणें
टिविला—वाद्यविशेष, नडगी
टेव—खाण, सांठा

ड

डंडलित—डळमाळित

ढ

ढवळणें—शुभ्र होणें

त

तलगें—पिलें
तुलिंग—प्रतिध्वनि
त्राहाटणें—वाजविणें

थ

थाव—बळ
थेंकुलें—थोडकें
थोकणें—गुप्त होणें

द

दंद—युद्ध
दळवैपण—सेनापतित्व
दादुला—स्वामी
दारुयंत्र—लाकडी बाहुलें

दुणावणें – दुप्पट होणें
दुवाडपण – कठिणत्व

ध

धरणें – प्रतिकार करणें
धवडणें – दवडणें

न

नव्हाळी – अपूर्वता
नागर – सुंदर
नावेक – क्षणभर
निपुणपणें – सूक्ष्मतेनें
निरय – नरक
निरवधि – निरंतर
निरोपितु – निरोप्या, सेवक
निवाडु – निर्णय
निशाण – नगारा
निहाळणें – पाहणें
नेणता – अज्ञानी

प

पंचानन – सिंह
पन्नासणें – सज्ज करणें
परिकर – सुंदर
परिसणें – ऐकणें.
परी – प्रकार
पल्लवस्वदशा – पदराच्या दशा
पाजळणें – प्रज्वालित होणें
पाडु – बहुमानाची जागा
पारुखणें – कुंठित होणें.
पुढतीपुढती – वारंवार
पेलणें – दामटणें, हाकणें
पैलु – पलीकडे
पोखणें – वाढणें

ब

बरळ – असंबद्ध
बहुवस – फार
बीक – तेज
बंबाळु – मोठा आवाज
बेंथु – आडदांड
ब्रह्मकटाह – ब्रह्मांडाची कढई

भ

भयासुर – भयंकर
भलतैसा – फार, अत्यंत
भेड – भ्याड, भित्रा
भोंगळ – तुतारी

म

मथणें – घासलें जाणें
मधाक – घुंगुरटें
मातु – गोष्ट
माधवी – जाईची वेल
मांदळ – मृदंग
माव – माया
मिरवणें – शोभणें
मोकळवाटी – स्थानत्याग
मौआळ – मऊ, हळुवार

य

येरयेर – परस्पर

र

रंगाथिलें – रंगविलेलें

रणतुरें-रणवाद्यें
रहंवरु-रथ
रासोभा—पाखरण
राहाटणें-फिरणें
रेखा-मर्यादा

व

वखणें—जाणें
वरगण-वाटणी
वरिचिल—क्षुल्लक
वरिव—श्रेष्ठपणा
वसैठ-वसतिस्थान
वाटिव-पराक्रम
वाणें-वाण, विणकर
विखारणें-विचार करणें
विभांडणें-जिंकणें
विरजा-सहाय्यकर्ता
विसणणें—सरसावणें
वेडावणें-वेडे होणें

श

शतकूड-शंभर तुकडे
शालक-मेहुणा

स

सखोल-गंभीर
संकुल-युक्त
सपुर—तल्प
सारिखें-सारखें
सांघात-संयोग
साचु-खरा
सानीव-लहानपण
सांदुकणें-प्रदीप्त होणें
साहणें-सहन करणें
सिक्यापणें-शिकविणें
सीतणें-स्पर्श करणें
सुरवाडणें-सुखी होणें
से—अनुमान
सैंघ-एकदम
संवरणें-वांचणें

ह

हियें-हृदय

क्ष

क्षुद्रघंटिका-घागऱ्या